# बि ग बा ळी

* * * ऐतिहासिक कादंबरी * * *

**मनमोहन**

प्रस्तावना

**म. म. दत्तो वामन पोतदार**




मॅजेस्टिक बुक स्टॉल गिरगांव, मुंबई ४.

किंमत तीन रुपये

# आशीर्वाद

**द. वा. पोतदार**—या तुम्ही 'मनमोहन'! आज इकडे कुणीकडे —

**मनमोहन**—आलों असाच! जुन्या गुरुजीच्या भेटीला!

**द. वा. पोतदार**—काय म्हणता? अनादीं रिकामे?

**मनमोहन**—नाहीं! तसेंच काहीं नाही! 'रिक्तहस्तं न पश्येत्' हें आपणचना शिकविलेत या आपल्या अवखळ मनमोहनला?

**द. वा. पोतदार**—पण आता 'मनमोहन' तुम्हीं 'कवि' म्हणून गाजता आहात! गर्जत आहात! तो जुना काळ गेला! काळानें पचवीस पाने त्यानन्तर उलटली!

**मनमोहन**—असेन. पण बारा वर्षां पूर्वी—

**द. वा. पोतदार**—का, बरें? आहे कीं ध्यानात! जरा समोर भिंतींकडे पहा बरें?

**मनमोहन**—'माझ्या पाठीवर तुझी शाबासकी।
उरूं दे ना बाकी कष्टाची ती॥ (४-४-२९)

**द. वा. पोतदार**—आहे ना ठीक? बरं, आता प्रस्तुत बोला!

**मनमोहन**—एक नवा उद्योग केलाय! मधें एकदा भारत इतिहास संशोधक मंडळात भेटलों तेव्हा बोललोंच होतों जरा—

**द. वा. पोतदार**—इतिहासाचीं साधने आम्हीं छापतो! तीं वाचण्याचा उद्योगच ना? काहीं लिहिण्यासाठीं—

**मनमोहन**---आज बरेच दिवस झाले ! तुमच्या मंडळांत बसून खूप वाचलंय् मी ! आणि नाना फडनिसांवर ही 'भिकबाळी' लिहून 'रोहिणींत' प्रसिद्ध केली---

**द. वा. पोतदार**---काय म्हणतां ? बरं बुवा जमतं तुम्हांला हें !

**मनमोहन**---आणखी पुष्कळ असंच लिहावं असं वाटतंय् ! आशीर्वाद मागायला आलोय् --

**द. वा. पोतदार**---मागा ! तो पूर्वींच दिलाय् ? हक्काचाच आहे तुमच्या! पण?

**मनमोहन**---पण कसला ? चुकांची भीति वाटते ना मनांत ! तरी पण चुकण्याचाहि आमचा हक्कच आहे ! आपल्या आशीर्वादानें सारें नीट होऊन जाईल !

**द. वा. पोतदार**---अहो ! हीं आमचीं इतिहासाचीं साधनें फार रूक्ष ! आणि तुमचा पिंड पडला कवीचा ! मग गोत्र कसं जुळावं ? चिंता वाटते !

**मनमोहन**---कां ? कवींना इकडे बंदी तर नाहीं ना ?

**द. वा. पोतदार**---बंदी काय म्हणून असेल ? आमचे परमानंद आणि जयराम हे कवीच होते कीं ! तुम्हा कवींच्या भराऱ्या इतिहासाला सोसत नाहींत ! कवी आभाळांत तर आम्ही भुईवर, इतकं थोरलं अंतर राहतें ना कवींत नि इतिहासकारांत !

**मनमोहन**---आम्ही अंतराळांत उड्डाणं करीत असलों तरी तेथून पृथ्वी दिसतेच कीं आम्हाला ! आजकाल विमानांतून पृथ्वीवरील दृश्यांच्या प्रतिमा काढीत असतात कीं ! तुम्हां पृथ्वीवरील मंडळींना पर्वत, अरण्यें आड आलीं म्हणजे पलीकडचे कांहीं दिसत नाहीं. तसं आमचं नाहीं. आम्हीं पर्वतांच्या पैलाडचं पाहूं शकतों.

**द. वा. पोतदार**---पण तुम्हीं कधीं कधीं इतकें उंच जाता कीं तुम्हांला तेथून पृथ्वी बारीक मोहरी एवढी दिसत असावी ! सारी पृथ्वी म्हणजे एक ठिपका जसा कांहीं !

**मनमोहन**—खरं आहे. कबूलच करतों आम्हीं कीं आम्हांला गगनभरारी उड्डाणांची फार हौस! पण गगनांतच कांहीं सर्वकाळ आम्हीं राहूं शकत नाहीं! 'पेट्रोल' पदरीं असेल तोवर आमचं स्वैर भ्रमण! अखेर भूमीला पाय टेंकावेच लागतात आम्हाला!

**द. वा. पोतदार**—पण मला वाटते, भुईवर तुम्हीं येत असाल, निदान तुमच्यातले काही जण तरी, ते केवळ झोपण्याकरिता! येथें भुईवर येतां नि खुशाल घोरतां!

**मनमोहन**—आम्हाला आमची विमानेंसुद्धा येथे भुईवरच ठेवावी लागतात कीं! जमीन कशी सुटेल!

**द. वा. पोतदार**—तुम्ही पुष्कळ सोडाल पण सुटली पाहिजे ना? तुमचे तें 'पेट्रोल' कुठून येतें? जमीनीतूनच ना? अहो, आम्ही जेव्हा जमीन खणतो, खोदतो, तेव्हा या पाताळगंगा हातीं लागतात बरें! आम्हाला इतिहाससशोधकाना तरी काय? जमीन खणावी, खोदावी तेव्हा पुराणीं खापरखुपरं हातीं लागतात, मणी-नाणीं मिळतात, नि त्याची जुळणी-मोडणी-तपासणी असा फार खटाटोप करावा लागतो. तेव्हा मग तीं खापरं अन् ते मणी, नि तीं नाणीं आपल्या कथा भडाभड सांगू लागतात! अन् तो इतिहास आम्ही जगाला सांगतों!

**मनमोहन**—एकूण काय, जमीनीवरून विमानात जावें, नि विमानातून जमिनीकडे दृष्टि टाकावी; मिळून दोहींकडून दोहीं डोळा अभ्यास करावा तेव्हा खरें ज्ञान पदरीं पडणार, असेंच ना?

**द. वा. पोतदार**—बरोबर बोललात! नाहीतर एकांगीपणा पदरीं येतो!, मनुष्य एक तर वाऱ्याबरोबर उडत, वाहवत जातो, नाहीं-तर भरंगळतो तरी!

**मनमोहन**—तसं होऊं नये म्हणून मी खूप प्रयत्न केलाय नि त्याचं फळ म्हणून ही 'भिकबाळी' आणली आहे आपल्या नजरे-

खालीं घालायला. एकदां आपला आशीर्वाद पदरीं पडला म्हणजे हायसे वाटेल मनाला !

**द. वा. पोतदार**--अवश्य पाहीन. म्हणाल तर आतांच वाचून काढूं. तुमच्या समक्षच.

**मनमोहन**--ठीक आहे, 'शुभस्य शीघ्रम् !' मला तरी तेंच पाहिजे होतें. [ वाचून झाल्यावर ]

**द. वा. पोतदार**--वाः ! तुमच्या कल्पनेचा वारू येथेंहि चौखूर उधळला आहे कीं ! खरोखर, तुमची कल्पनाशक्ति अचाट आहे. कांहीं वेळा मन थक्क होऊन जात ! तेंच तुमचं खरं सामर्थ्य आहे ! तुमच्या कविता, गोष्टी मधून मधून वाचावयाला मिळतात, त्यातहि हाच अनुभव येतो ! पण इतिहासात फार सबुरीनं लेखणी चालवावी लागते ! तोलून, आवरून लगाम खेचून, समजलात, मनमोहन ! सुरवातीलाच तुम्हीं--

**मनमोहन**-- ओळखलंत का आमचं गुपीत !

**द. वा. पोतदार**--तुम्हीं मंडलिकाना मधेंच घातलेंत म्हणून काय तुमचं गुपीत दडून राहील होय ? बरोबर हेरलं कीं नाहीं ! पण हें पहा. हा दापोडीच्या मैदानातून कोरेगांवचा विजयस्तंभ तुम्हीं पाहिला, तो कल्पनेनें पाहिला का प्रत्यक्ष ? पंधरावीस मैलावरचा तो चिमुकला स्तंभ इतक्या लाबून प्रत्यक्ष डोळ्यानी दिसेल का कधीं ? मग म्हणतो काय मी ! कळल का ?

**मनमोहन**--अंगावर आली म्हणायची बाजू !

**द. वा. पोतदार**--बरं, तुमच्या पुस्तकाचं नाव 'भिकबाळी' ! तुम्हांला नाना फडणीसांच्या तसबिरींत दिसली, होय ना ? पहा बरं, नीट पुन्हां एकदा तें चित्र ! हें पहा, मी दाखवितो, मजजवळ त्याच चित्राची प्रतिमा आहे. पाहिलीत ? कुठं आहे 'भिकबाळी' ह्यांत ? अहो ! बिगबाळी म्हणतात ना, ती उजव्या कानाच्या वरच्या पुडाला भोंक पाडून त्यांत बस-

विलेली असते ! खालच्या पुडात नव्हे ! खालच्या पुडात तुम्हांला जो वाटोळा अलंकार नानांच्या कानांत–दोन्ही कानांत, बरं का एका नव्हे, भिकबाळी एकाच म्हणजे उजव्या कानांतच असावयाची–दिसतो तो भिकबाळी नव्हे ! अहो ! मोत्यांची कुंडलं आहेत म्हटलं, कुंडलं तीं, मनमोहन महाराज ! अगदीच घसरलांत की !

**मनमोहन**—इं ! घसरलों खरे ! आजूबाजूला थोड्या का दिसतात भिकबाळ्या मला ? पण गेलों लिहून भरात नि काय ?

**द. वा. पोतदार**—इथंच तर नडतंना सार ! मग म्हणतो काय मी ? आता पुढं पाहूं. हा तुमच्या नानाचा ‘ चोवीस खणीं दिवाणखाना ! आज एकच शिल्लक राहिला आहे, तो चोवीस खणी नाहीं, पण असेल एखादा पूर्वी ! त्यात अवघड काहीं नाही. पण हे नानासाहेब–तुम्ही नाना फडणिसाना नानासाहेब म्हणतां आहांत, हॅा–याचे मुख्य कारभारी ‘ चंद्रचूड ’ कुठले ? गंगोबा तात्या चद्रचूड होळकराचे दिवाण; पुढे माधवराव पेशवे त्याच्यावर उखडले नि त्यांनीं एवढ्या मातबर वृद्धाला छडीनें चोपलें ! नानाचा आणि चद्रचूडाचा आंतरिक एक पुष्ठा कुठला सभवणार ? चंद्रचूडाच्या जोडीला तुम्ही चक्रदेवांनाहि आणलेंत ! त्यांत तुमचा बारकावा दिसत नाहीं ! आणि हे हो काय ? राक्षसभुवनच्या लढाईत ‘हैदरअली’ ? भलतंच ! बरं हे ‘ हरगीज ’ काय ? जुन्या कागदपत्रातले शब्द नीट बरोबर अर्थानें वापरले तर ठीक ! आपल्याकडले काहीं नाटककार, कथाकार उगाच न समजता जुने शब्द वाटेल तसे दडपून देतात !

**मनमोहन**—वाटेल तसे दडपतात ?

**द. वा. पोतदार**—नाहींतर काय ? पहा ना, ते ‘ बेबंदशाही ’ नाटकाचे कर्ते औंधकर ! एकदा त्याच्या समक्ष असल्या बावीस चुकांची

यादी सभेला मला सादर करावी लागली ! एवढा लोकप्रिय नाटककार ! पण ही सावधानी कांहीं ठेवली नाहीं ! म्हणून म्हणतो ना, सावध! हरगीज म्हणजे 'कदापि', नि तुम्हांस वाटलं कीं त्याचा अर्थ 'हरकत' आहे. 'हरगीज हरकत नव्हती' असं म्हटलं असतंत तर 'हरगीज' हरकत नव्हती ! चालले असते.

**मनमोहन**—फार बारीकपणे पाहिलं आहे तुम्ही. आमच्या फायद्याचंच आहे.

**द. वा. पोतदार**—आणखी पुष्कळ निघेल. सती जाताना पिवळीं वस्त्रें परिधान करतात राजस्थानात. तुम्हीं 'केशरी' म्हटलं आहेत. धकून जाईल. पण हे काय ? चूक कीं खिळा ?

**मनमोहन**—ऑ !

**द. वा. पोतदार**—'अवघ्या तेविसाव्या वर्षी राज्यसूत्रे हातीं घेऊन' हें काय ? माधवराव थोरले याचा जन्म शके १६६६ चा, माघातला त्याना वस्त्रे मिळालीं शके १६८३ च्या आषाढात, काय ? म्हणजे पेशवे झाले तेव्हा त्याचें वय काय ठरतें ? सोळा, सुमारे. मग तेवीस कुठले काढलेत तुम्ही ? माधवरावाचा स्वर्गवास झाला शके १६९४ त कार्तिक व. ८ ला. अवघ्या सत्तावीसअठ्ठाविसाव्या वर्षी ! असे घसरलांत नि काय ?

**मनमोहन**—'तेविसाव्या तला 'ते' काढून टाकूं मग तर झाले ?

**द. वा. पोतदार**—ही काय मारवाडी हिशेबांतली तडजोड आहे कीं काय ? बारीक गोष्टींत कुठे आम्ही छळतो तुम्हाला ? तुम्हीं माधवरावाचे प्राण 'निष्कर्ज' अवस्थेत शात करण्याचें कर्णाचें दातृत्व दरेकरांच्या पदरीं घातलंत ! तसं म्हटलं तर दरेकर एवढे मातबर सावकार नव्हते, तोलदार सरलष्कर होते ते— नाव गाजतं या प्रकरणीं ते रामचंद्र नाईकाचं ! पण ती घासाघीस आम्ही कुठ करतो तुमच्याशीं ? पण जेव्हां

तुम्हीं गोपिकाबाईला खुन्या मुरलीधराजवळील द्रविडाला आमंत्रण देण्याला तयार करता तेव्हा बोलणं प्राप्तच होतं! करणार काय? आता तुम्हीच पहा, तुमच्या घराजवळ अगदीं तुमच्या आळींत आहे हा खुन्या मुरलीधर, होय ना? रागावूं नका, नाहींतरी तुम्हीं एकदा विद्यार्थी होतांच, तेव्हां माझं बोलण थोडें त्या नमुन्यावर गेलं तर! बरं का, या देवळात एक शिलालेखहि आहे. हा मुरलीधर गद्र्यानीं स्थापला, तें साल म्हणजे शके १७१९ किंवा इ. स. त बोलायचं तर इ. स. १७९७. या वेळीं गोपिकाबाईला मरून देखील दहा वर्षे होत आलीं होतीं. असं हें त्रागडं केलत तुम्हीं! बाकी, तुमच्या ध्यानात नसेल आलं त्यावेळीं. अहो, असा कालविपर्यास कसा करून चालेल? मग उद्या कोणी शिवाजीमहाराज एकदा 'लकी' मध्यें चहा पीत बसले होते असं बोलून जाईल! किंवा त्यांनीं दरबारात प्रवेश केला नि स्विच्-कळ-ओढली की सर्वत्र विद्युद्दीपाचा लखलखाट झाला, असें ठोकून देईल; तर दुसरा कोणी तानाजी मालुसेर आणि बाजीराव ओंकारेश्वरीं गुप्त खलबत करीत बसले होते असं सांगेल! कसं चालेल हें? चुका-चुकांतहि अंतर असतं. तुम्हीं गारद्यांना मस्तानी दरवाज्यांतून आत सोडल आहेत. खरं म्हटलं तर ते उतरले वाड्यात ते गणेश दरवाज्यापलीकडील नवीन दरवाज्याचं काम चाललं होतं तेथून, मस्तानी दरवाज्यातून नव्हे. ही झाली चूक, जाईल खपून. पण मोठाले खिळे, त्याचं काय?

**मनमोहन**—आम्हांला तरी तसले खिळे कसे चालतील?

**द. वा. पोतदार**—आता हेंच पहा, तुम्ही लिहिता कीं नारायणरावाच्या खुना-नंतर गंगाबाईने सती जावें असा आनंदीबाईनें आग्रह धरिला. पण ठाऊक असलेला प्रकार याच्या उलट आहे.

सती जाण्याचा आग्रह गंगाबाईचाच होता. नुकतीच मोराबादादा फडणीस यांची मातोश्री सती निघाली होती ते उदाहरण ताजंच होतें. आतां कोणी म्हणतात, गंगाबाईला पार्वतीबाईनें, कोणी म्हणतात आनंदीबाईने राहविली ! ! आनंदीबाईवर कांहींहि शेकविलें तर आज खपून जाईल, कथेला उठाव येईल. पण जें शाबीत नाहीं किंवा जे उलटच शाबीत ठरेल तेंहि तिच्या अंगावर लोटले तर सत्याला जागल्यासारखें कसें होईल? एकदा 'कानफाट्या' नांव पडलें कीं मग कोणीहि अंगावर कोसळावें, अशातलाच प्रकार होतो.

**मनमोहन**—पण येवढी बंधन कडकपणें पाळली तर कथा सारी निरंग होऊन जाईल ना ! आनंदीबाईचा स्वभाव जो एकूणातींत दिसून येतो तो कायम ठेवून कांहीं फिरवाफिरव करून कथेला रंग भरता आल्यास तें मला वाटतं चाललं पाहिजे.

**द. वा. पोतदार**---रंग भरा हो ! तुम्ही कथाच लिहावयाला बसलात तेव्हा निरंग कथा वाचील कोण ? पण खराखुरा इतिहास आणि त्यातील खऱ्याखुऱ्या घटनाचे बारीक सारीक तपशील, मोडकातुटका सारा धागान् धागा जर तुम्हीं लक्ष्यात ठेवाल तर तुमच्या कल्पनेची भूक कितीहि कडक असो, तिची वखवख पुरविणें अवघड नाहीं. पण कल्पनेला सारंच रान मोकळं सोडून कसें निभेल? तुम्हीं गोपाळ शाहिर निर्मिलात, त्याला आपल्या मनाजोगता साज चढविलांत. अगदीं डोक्यावर घेतलात. आम्हीं सोसून घेतलं. म्हटलं जाऊद्या, आजकाल आपल्या जुन्या शाहीरांकडे तुम्हां लोकांची माया वळली आहे. वळूं द्या ! बनवा त्याना तुमच्या मनाचे वीर, थोर ! तुमच्या कथेंत तुम्हीं कल्पनेची चटक 'चांदणी आणून खेळविलीत, खेळवा. आम्हीं खामोष राहूं. पण जेव्हा या मोकळीकीचा लगाम सैल सोडून तुम्हीं महादजीच्या लष्करांत कान्होजीराव लगड

नांवाच्या एका नसलेल्या शिलेदाराचं नांव दिलं घुसडून, तेव्हां इतिहासाच्या याद्यांत भरभरून येणारी शिंद्याच्या शिलेदारांची सारीं खरीं नांवें ओरडत उठणार नाहींत का कीं हा तोतया शिलेदार कोठला कोण म्हणून ?

**मनमोहन**——ही तुमची अखंडबंदी सोसावयाची म्हणजे आमच्या प्रतिभेचं भस्म होऊन जाईल एखादे वेळीं ! पण आता हात घातलाच आहे तर तुमचा संतोष होईल असं कर्तुक करून दाखवूं.

**द. वा. पोतदार**——केलत तर काय आम्हाला नको का आहे? भस्माला का एवढें भिता ? एवढाले कडक धातू असतात, सोनं काय नि लोखंड काय, पण काटेमाठाची पुटं चढविली, भट्टीत घातली नि मातकापड केलं ना, म्हणजेच भस्म होतात ! लोहभस्म, ताम्रभस्म हीं भस्मं असलीं, तरी केवळ दिव्य होऊन बसतात. मग तुमच्या प्रतिभेला एवढं गागरायला हो कशाला हव ? असं पहा, खिळे तर चालणारच नाहींत पण ' चुका ' नि ' टाचण्या ' काय कमी बोचतात म्हणतां ?

**मनमोहन**——तुम्हाला टोचताहेत टांचण्या नि चुका आणि तुम्हीं टोंचताय आम्हाला ! खूप जमलाय बेत नि काय !

**द. वा. पोतदार**——हाहि एक रंगच भरला म्हणाना ? तुमची कादंबरीच तेवढी रंगावी अन् आमचा आशीर्वाद मात्र काय अगदीं रूक्ष असावा, हा कोठला न्याय ? गम्मत बघा, एकाच प्रकरणात सवाई माधवराव दहा महिन्याचा असतो आणि त्याच प्रकरणांत ' महाभारत आणि रामायण ' याचांहि वाचन तुम्हीं त्याजकडून नानाकरवी करविता ?

**मनमोहन**——म्हणजे बरेंच शेकतें आहे कीं आमच्या अंगावर !

**द. वा. पोतदार**—गाणारा जसा तालांत पक्का असावा लागतो ना, तसा ऐतिहासिक विषयांवर कथा लिहिणारा कां असेना पण कालांत पक्का असावा लागतो! काल हा इतिहासाचा चक्षु म्हटला आहे तो का फुकटच? नानाचं चरित्र तुम्हाला सहज दाखवून देईल कीं तो नानाचा दत्तक तुम्हीं म्हणता ना, तो नानांनी कधीच घेतलेला नव्हता. दत्तक माडीवर न घेतांच हा लोक नानानी सोडला. नानाच्या पश्चात् सत्तावीस वर्षांनीं त्याची स्त्री जिऊबाई यांनीं दत्तक घेतला आणि त्याचें नाव माधवराव ठेवलें. तुम्हीं नाव देता दामोदर. कुठून मिळाल हें नाव तुम्हाला? या माधवरावाचं मूळ नाव गंगाधर होतं! दुसरं एक घ्या. रघुनाथराव दादासाहेब पेशवे यानी भुसकुटे घराण्यातील दत्तक घेतला तो अमृतराव. हा दत्तक घेतल्यावर आनंदीबाईला बाजीराव, चिमाजी हे दोन पुत्र झाले. अर्थात् अमृतराव बाजीरावाचा सावत्र असला तरी वडील भाऊ नि तुम्हीं केला त्याला धाकटा भाऊ! आणि एके जागीं तुम्ही हरिपंत पिंगळे लिहिलं. पुढे गोविंदराव पिंगळे नाव दिलें तेच बरोबर. तुम्हीं प्रभाकरादि शाहीर मडळी आणली आहेत. पण ही मंडळी विशेष चमकली ती नानाच्या नंतरच. काय हो, 'सूर्य मंडळ भेदून जाणे' म्हणजे तुम्हीं काय समजता? नुसता कोणी मरतो तो सूर्यमंडळ भेदून जात नाहीं! 'द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ, इ. प्रमाणें 'परिव्राड् योगयुक्तश्च रणेचाभिमुखोहतः, असेल त्यालाच तसें म्हणतात! कारंजावर काळीज टाकून सूर्यमंडळाचा भेद कसा घडेल? आणखी एक शंका. जिवबादादा जाबगांवाला वारले ना, मग पुनः बाळोबादि मंडळी बरोबर आठ हजार 'कंगणीं पगडीचा उडता घेऊन' तुम्हीं त्याना कोठून आणलं बरं! सूर्यमंडळासारखंच हें 'सरकारकून प्रकरण' थोडें सुनावं कां? तुमचे नाना सरकार-

कुनाना पर्वतीच्या पायऱ्या उतरताना एका किरकोळ कारकुनासारखे बोलतात, त्यावरून तुम्हाला सरकारकून म्हणजे हल्लीच्या हेडक्लार्कप्रमाणें वाटलें असावे. पण खुद्द पेशवे प्रभृति मंडळीच ' सरकारकून मंडळींत' जमा असत एके काळीं, म्हणून तो काळ नीट उठवावयाचा आणि नव्या कुंचल्यात जुने शब्द भरावयाचे तर त्यालाहि बारकावा फार पाळावा लागतो.

**मनमोहन**—तें आलें आतां बरंच ध्यानांत. आणि सारा बारकावा काबूंत आणण्याचा माझा निश्चयहि पण आतां पक्का झाला.

**द. वा. पोतदार**—आम्हांला तरी आणखी काय पाहिजे ? तसं कराल बर त्यात संतोषच आहे आम्हाला. हें बघा—

**मनमोहन**—आणखी काहीं उरलंच आहे का अजून ?

**द. वा. पोतदार**—अहो, हें आमचं चक्र असं का थांबणार आहे ? पण काय हो, मनमोहन, एक गुपित विचारू का ? तुमचा तो गोपाळ शाहीर अगदीं तुमच्या तोंडावळ्याचाच दिसतोय मला !

**मनमोहन**—तुमच्या दृष्टींतून काहींच निसटेल असं दिसत नाहीं.

**द. वा. पोतदार**—अहो, चालेल कसं आम्हांला डोळे झाकून ! तें राहूं द्या ! पण असं समजूं नका कीं तुमच्या ' भिगबाळीं 'त ह्या टपोऱ्या मोत्याचें पाणी आम्हाला जोखतां आलं नाहीं ! अहो ! तेज तें तेज !

# समर्पण

डॉ. सौ. मधुमालती सुरू ( गुणे )

यांना

दाट गहन गूढ तिमिरांतुनि
झळकालि विद्यावति सौदामिनी
विशाल विटपावरली वनवेली
मधुमालती ही होई कीर्तिशाली

अशोक व्हिला
पुणे २.

मनमोहन

# उपोद्घात

★ एस पी. च्या 'इतिहास' हा ऐच्छिक विषय घेतलेल्या विद्यार्थ्यांना त्यांचे प्रोफेसर गणेश खिंडीकडे ऐतिहासिक चित्रसंग्रह पहावयासाठीं घेऊन जाणार होते.

पूर्वेच्या बाजूच्या एका टेकडीच्या मागच्या बाजूने तळपणाऱ्या आणि झळकणाऱ्या संगिनी हातातल्या बंदुकींना लावीत हिंदच्या सरलष्करातील कांहीं नवीन भरती झालेले शिपाई 'हल्या'ची बतावणी करीत होते...

...त्या सैनिकांच्या रांगेच्या मागच्या बाजूला धूसर अंबराच्या अडोशाला अरुणाचा 'रिसाला' आपल्या जरतारी मंदिलाचे शमले उडावित उडवित विजयोन्मादानें उधळत उधळत वेगानें उलट वहाणाऱ्या वायुलहरींकडून धाकानें वाट मागत चालला होता.

दूरवरल्या टॉवरवरल्या अगदीं 'उंच' मजल्यावर घड्याळ 'दिक्काला'च्या धाग्याचा 'गुंता' आपल्या दोन हातानें सोडवित बसलें होतें.

अहोरात्र न कंटाळता न थकता न चिडता तें ह्या 'चोखंदळ' कामांत गर्क झालें होतें.

कॉलेजच्या इमारतीच्या बाहेरच्या मुख्य रस्त्यावरल्या समोरासमोर असलेल्या दोन्हीं हॉटेलातून पहाटेच्या निवांत वातावरणाला 'सुई'नें गोंदण्याचे काम सुरू झालें होते.

एका दगडाने दोन पक्षी मारणाऱ्या पारध्याच्या चातुर्यानें काही 'सुशिक्षित' एका आण्यात 'सिंगल' बरोबर 'सकाळ'चीहि शिकार करीत होते.

मेगाच्या तबकड्याना सुईने स्पर्श करतांच त्या स्वरलहरी उधळूं लागल्या.

पोर्चच्या खालीं एका स्टेशन वॅगनमध्यें निघावयाच्या तयारीने सारे विद्यार्थी बसले होते. सारे आतां जमले होते.

आता प्रोफेसर येण्याचाच काय तो अवकाश होता. 'सैन्य' जमलें होते. सेनापती अजून आले नव्हते.

आणि निघावयाची जी वेळ निश्चित केली गेलेली होती ती ... अजून अर्धा तास अवकाश होता.

✦ ✦ ✦ ✦

परंतु आता तीनच मिनिटें अवधी उरला होता. मुले वाट पहात होती. अजून आपला 'नेताजी' कसा आला नाहीं याची ती काळजी करीत होती.

...'मंडलिका'च्या आत्म्यालाही प्रतिस्पर्धी वाटावे असे ते नेताजी अगदीं 'घड्याळ लाऊन घ्यावें' कां काय म्हणतात अशा बेतानें आले.

स्नान संध्या आटपूनच ते आले होते. नेहमींप्रमाणें डोक्यावर रुमाल न बांधता आज त्यांनी पगडी घातली होती. वृक्षावरल्या वल्लरी सारखे त्यांच्या कंठाला 'वेलांटी' देणाऱ्या उपरण्याचेही कांठ आज

जरतारी होते. कपाळावरले गंधही आज केशरी होते. आणि आजच्या त्यांच्या मुखावरल्या स्मितातही थोडी अधिक ' तेजि ' होती.

आणि मोटार सुरू झाली.

✦ ✦ ✦ ✦

काही वेळ प्रवासांत गेला. चतुश्रृंगीच्या मागल्या बाजूला खडकीच्या पुलापलिकडे, दापोडीच्या उत्तर दिशेला ती मोटार हिंडून आली.

पेशवाईच्या अखेरिच्या कालखंडात इंग्रजाच्या त्याच्या जेथे जेथें झटापटी झाल्या त्या ' वास्तूं ' चें दर्शन त्यांच्या नेताजींनी त्यांना घडविलें.

प्रत्येक लढाईची माहितीही त्रोटक रीतीनें तेथे सांगितली गेली. ती सांगत असतांना आणि ऐकत असताना सारे आपल्या डोळ्यासमोर ' भूतकाळ ' उभा करीत होते.

✦ ✦ ✦ ✦

बरोबर दीडशे वर्षांपूर्वी ते आज पहात असलेल्या त्या मरुभूमिवरील गरम ढेकळे नि ढेकळे निमकहरामांच्या आनंदाश्रूंनी आणि निमकहलालांच्या रक्ताने भिजून गेली होती...

ते कोरेगाव— तो दुरून दिसतो आहे तो विजयस्तंभ —

त्या विजयस्तंभाच्या पलिकडे असलेल्या अंबिलओढ्यात देहाची दहा ठिकाणी दैना झालेल्या बापू गोखल्याने दोन दिवस लपून आश्रय घेतला होता.

ती पर्वती—

फडक्याच्या दिमतीतील लेफ्टनंट क्लोजने लाचलुचपत देऊन फितवलेली मुधोळची पायदळ सेना ऐन झुंजाच्या वेळेला आपली हत्यारे घेऊन यांच देवळामागल्या पर्वताईच्या दरीत छपून बसली होती.

आणि हेंच तें देऊळ; कीं जेथून बाजिराव आपली सर्व 'दाने' उलटी पडलेली आहेत असं दिसून येताच 'पटा' वरल्या सोंगट्या

पटावरच टेकून देत पालखीत बसून सोलापूर–पंढरपूरच्या बाजूनें बारा वाटा पळून गेला.

इतिहास वाचलेल्या माणसाला पुण्याभोंवतालच्या परिसरातून डोळे ओले केल्या शिवाय चालता येणें कठीण आहे.

इतिहास अभ्यासिलेल्या आत्म्याला अभिमानानें छातीं पुढे काढल्या शिवाय खडकीच्या बाजूने चालता येणार नाहीं.

रक्त आणि अश्रू, आशा आणि निराशा, तृषा आणि तृप्ती, भोग आणि त्याग, मीलन आणि विरह, चैतन्य आणि उदासीनता, शौर्य आणि भीरुता, सिंहासन आणि दर्भासन, विलास आणि सन्यास, इमान आणि स्वार्थ, जन्म आणि मृत्यु, यांच्या 'दुकला' हातात हात घालून येथे चालताना दिसू शकतात!

आश्चर्याच्या अडोशाला उभे रहाण्याची संवय असलेल्या माणसालाही कुतुहल वाटावे अशा घटना प्रत्यक्षांत घडून गेल्या.

देशासाठीं —? ..इथे अनेक लढले, .

धर्मासाठीं— ?...इथे अनेक मेले.. .

स्वार्थासाठीं—?...इथें अनेक जगले....

अखेरीच्या वाताहातीत इथें जे जें घडलें तें तें सारे नोंदले गेले तर ?

परंतु ही वाताहत का झाली ?

पेशवा कां हरला ?

बापू गोखला मारला का गेला ?

मराठ्याचे राज्य नाहींसे कां झाले ?

अनेक वेळा देशाचे भवितव्य त्या देशाच्या दुर्दैवाने एकाच व्यक्तीवर अवलंबून असते

दुर्दैवाने असे म्हणावयाचे कारण असे कीं ती व्यक्ति जिवंत असते तोपर्यंत सारे ठीक असते. संकटे आली तरीं त्या कर्तृत्ववान पुरुषाच्या पराक्रमानें त्यांचा धुव्वा उडतो.

दिवस असे आले किंवा दिवस तसे आले तरी देश पुढे आणि पुढें चाललेला दिसतो. घर फिरलें आणि त्या बरोबरच घराचें वासे फिरले तरी तो सत्पुरुष त्या देशांच्या विजयस्तंभाला आपल्या पराक्रमाच्या जोरावर शत्रूला धक्का देऊ देत नाहीं. नेपोलियन होता तोंवर फ्रान्सकडे कोणी वाकडी भृकुटी करून पाहिले नाहीं.

तैमुरची तलवार तळपत होती तोवर त्याच्या देशाशीं दुष्मनी करण्यासाठीं कुणाची माय व्यायली नव्हती.

परंतु या व्यक्ति नाहींशा झाल्या....

आणि मग त्या देशाची वाताहात झाली. ज्या राजवाड्यात ते महान् लोकोत्तर पुरुष रहात होते ते राजवाडे—?

त्यावरून नांगर फिरले...

जी विलास मंदिरें होती तेथें लुद भरलेली कुत्री आपले अंग निवाऱ्यासाठीं टेकूं लागली.

विश्वाच्या नकाशाचा रंग बदलावयाची खलबते जेथें मुत्सद्दी करीत बसत त्या दरबाराच्या जागेत जगांतून उठलेलें कलंदर आपली गांजाची चिलीम गरम करत केलेल्या यशस्वी गुन्हेगारीच्या गोष्टीला तिखट मीठ लावीत बसूं लागले.

याचा अर्थ असा कीं !...

काळ पुरुषाच्या हातात जें तराजू आहे त्यांत भगवंताच्या 'सुदर्शनाचे,' शिवप्रभूच्या 'भवानी'चे, तैमुरच्या 'तलवारी'चे, रणजित सिंगाच्या 'कृपाणाचे' वजन शेरा सव्वाशेराहून अधिक भरत नाहीं.

अशा थोर पुरुषाच्या अस्तित्वानें देश प्रगत रहात असला तरी तो अत्यंत परावलंबी बनतो.

आणि केव्हा तरी त्याचा अधःपात होतो. वडीलांचे बोट धरून प्रवास करणाऱ्या मुलाची बाजारांत चुकल्यानंतर जी अवस्था होते तशीच त्या थोर पुरुषांच्या मृत्युनंतर आम जनतेची होते.

आणि—?

आपण मुख्य सूत्रावर येऊया.

पेशवाई का बुडाली याचे कारण ?

याचें कारण ?

खरेंच याचे कारण काय ?

बाहेरचा ' वनविहार' संपऊन मुले आता आपल्या 'नेताजी' च्या सान्निध्यात चित्रशाळेंत येऊन पोचली होती.

पेशवाईतील सुप्रसिद्धांची त्यावेळच्या चित्रकारांनी काढलेली मोठ मोठीं चित्रे तेथे संगतवार टांगून ठेविली होती.

एकेक चित्र पहात मुले पुढे पुढें चाललेली होती.

टिपू सुलतानाचें चित्र होते, त्याच्या हातात पाचूची बहुमोलाची अंगठी होती. पुढे नेपोलियनचा पराभव ज्याने केला त्या डयूक ऑफ वेलिंग्टनची एक तसबीर तेथे होती. धारवाडकडचे धोंड्या वाघाचे बंड मोडून पुण्यात येऊन तो हिराबागेंत कांहीं दिवस राहिला होता–त्यावेळीं केंव्हातरी ते चित्र काढलें होते.

गरूडा सारखे नाक...

घारी सारखे तेजस्वी डोळे...

सर्व मुले त्या चित्राकडे कौतुकानें पहात होती. आणि पहाता पहाता त्याच्या पराक्रमी जीवनचरित्राची वाखाणणी करीत होती.

गोडबोले नावाचा विद्यार्थी अम्मळ भावनाप्रधान होता.

त्याच्या तोंडांतून तर प्रकटपणें कौतुकोद्गार बाहेर पडले.

गुरुजींचे लक्ष आपल्याकडे वेधून घेत तो बोलू लागला.

" सर ! अशी माणसे आपल्याकडे असती तर पेशवाई बुडाली नसती."

सर यावर नुसतें हंसले.

" काय डोळे आहेत ! " गोडबोले उद्गारला.

सर यावर नुसत हसल.

" काय धारदार नाक आहे ! " गोडबोलेच उद्गारला.

  

पुढच्या बाजूला सवाई माधवरावाच्या दरबाराचे भव्य चित्र होते.

त्याचेही निरिक्षण विद्यार्थ्यांनी केल परंतु ते धावते होतें.

त्यापुढें मौंट स्टुअर्ट एलफिस्टनची छबी होती. त्याकडे पहात असतांना पुन्हा गोडबोल्याचे तोंड सुटले.

" काय विशाल भाल आहे. या एकाने येथें शांतता प्रस्थापित केली. साताऱ्याला शह याने दिला. कोल्हापूर यानें ताब्यात घेतलें. सांगली मिरजेकडे राजकारण यानेच केले. मुंबईचे पोर्तुगीझांचे समझोते यानेंच घातलें. " गोडबोले म्हणाला.

सर नुसते हंसले.

त्यापुढें पहिल्या बाजीरावाचे चित्र होतें. त्याचीहि वाहवा झाली.

शिवाजीच्या चित्रालाही साऱ्यांनीं वंदन केले.

त्या पुढें...

आणि त्यापुढें—?

त्यापुढें नानासाहेब फडणवीसांची तसबीर होती.

उभट चेहेऱ्याची, गंभीर प्रकृतीची, कानात 'बिगबाळी' घातलेली,—

कंठांत मोत्याचा कंठा होता. हातामध्यें पोथी होती. पगडीवर हिर्कण्याचा तुरा होता..

मलमली अंगरख्याच्या आतले भगवे वस्त्रही खुबीनें रंगविलेलें होते.

गोडबोले त्या चित्रासमोर उभा होता. क्षणभर तो त्या चित्राकडे टक लाऊन पहात होता.

पळभर त्याचे डोळे आणि त्या मोठ्या चित्रातले डोळे एकमेकाकडे पाहू लागले.



त्या चित्राकडे पहात असतानांच गोडबोल्यांच्या मुखावरले कौतुकभाव पार नाहींसे झालें.

त्या उलट तिरस्काराचेच भाव त्यांच्या तोंडावर उपस्थित झाले. असे का झाले याचे कारण काय तें मात्र त्यांचे त्यांना ठाऊक;

कांहीं वेळानें ते उदासीन भाव आपल्या हृदयाशी सांभाळीत सांभाळीत ते पुढें बोलूं लागले—

"सर! नाना अगदी किरकोळ वाटतात. डयूकच्या किंवा एलफिस्टनच्या चरित्राशीं त्यांना तुलले तर हे पेशव्यांचे पंतप्रधान अगदीच किरकोळ वाटतात—"

सर नुसते हंसले—

गोडबोल्यानी हे वाक्य उच्चारून झाल्यावर पुन्हा आपली नजर त्या चित्राकडे खिळविली.

तो काय चमत्कार...

✦ ✦ ✦ ✦

पहाता पहाता त्या चित्रातल्या नानांचे डोळे आपल्याकडे पाहून तेजाबाचे शिंतोडे उडवीत आहेत असे गोडबोल्यांना वाटलें.

पण असा भास क्षणभरच झाला.

कांहीं वेळानें नाना आपल्याकडे पाहून स्मित करीत आहेत असे गोडबोल्यांना वाटले.

परंतु हाही भास क्षणभरच झाला.

मग!

✦ ✦ ✦ ✦

मग!

पुढें कांहीं वेळानें गोडबोले पाहूं लागतात तो...

...तो त्या तसबिरींतले सारे लालसर छटा असलेले पिवळे तांबडे रंग शरदभ्राप्रमाणें विरघळूं लागले...नाहींसें होऊं लागले.

आणि थोड्या घटका पुढें लोटनात तो नानांची छबीही त्या सोनेरी नक्षीच्या चौकटींतून पार नाहींशी झाली.

गोडबोले पहात होते.

काळ्या ढगातील चंद्रबिंब तेवढे दिसावें तसें...

तशी त्या मोठ्या फ्रेममध्यें कानांतली 'बिगबाळी' तेवढी आतां दिसत होती.

...त्या टपोर मोत्याकडे गोडबोल्यांना लक्ष देणें आतां क्रमप्राप्तच होते.

आणि मोत्याच्या त्या इवल्याशा परिघात गोडबोल्यांना...



— १ —

# गणपतीच्या देवळांत !

थेऊरहून तुफान वेगानें निघालेला तो स्वार नानांच्या मोठ्या वाड्याच्या दिंडी दरवाजाशी येऊन थांबला. घामाने थब-थबलेल्या वारूवरील मांड त्याने काढली. तो खालीं उतरला. आणि स्वतःच्या कपाळावरील घाम निथळावयाचीहि फुरसत न घेतां त्यानें दारावरल्या नागव्या तरवारीच्या पहारेकऱ्याला—

' साबाजी, हुजूर पागेत हा घोडा घेऊन जा. मोतद्दाराला याची चांगली चाकरी करावयास सांग आणि दुसरा एक ताज्या दमाचा घोडा घेऊन या. नानासाहेबांकडे निरोप पोंचता करून मला त थेऊरला जावयाचे आहे. '' असे म्हणत म्हणत त्या स्वारानें आपल्या घोड्याचा लगाम त्याच्या अंगावर टाकला.

" पण शिलेदार, सरकारांची तब्येत कशी आहे ? कांहीं आशा ? " साबाजीनें काळजीच्या स्वरांत विचारले.

" आता सर्व त्याच्या आधीन आहे. '' आकाशाकडे बोट करीत त्या स्वारानें उत्तर दिलें.

✦ ✦ ✦ ✦

आपल्या चोवीस खणी प्रशस्त दिवाणखान्यांत नाना एकांतांत शतपावली करीत होते. होय! त्यांचे सारे लक्ष थेऊरकडेच लागले होते.

गणपतीच्या देवळांत आपलें अंथरूण टाकून पडलेल्या पेशव्यां-कडेच त्यांचे सारे लक्ष होते.

श्रीमंत माधवराव पेशवे क्षयाच्या असाध्य दुखण्यानें शेवटच्या घटका मोजीत होते. पुण्यास जरुरीची कामे करावयाची होती म्हणून दोन दिवसापूर्वीच नानासाहेब थेऊरहून श्रीमंतांची परवानगी घेऊन पुण्यास परत आले होते.

ते पुण्यात आले होते तरी त्याचे सारें लक्ष आपल्या धन्याच्या शय्येपाशीच गुंतून पडलेलें होते.

आपल्याला घटके घटकेने राजांचे प्रकृतिमान कळावे म्हणून त्यानी तासा तासाच्या अंतरानें तिकडून निरोप घेऊन येणारी माणसे ठेविली होती.

✦ ✦ ✦ ✦

परंतु नानासाहेबाचे मुख्य कारभारी चद्रचूड आत आले. आणि थेऊरहून ' तुळाजी पवार ' आल्याची जेव्हां त्यांनी खबर दिली तेव्हां त्यांच्या मनांत चर्रर झाले.

तुळाजी माधवराव पेशव्याचा विश्वासू नोकर होता. कांहीं अंतस्थ कारण असल्या शिवाय पेशव्यानीं त्याला इकडे धाडले नसते...

✦ ✦ ✦ ✦

आत येताच तुळाजीने विनम्र भावाने पेशव्यांच्या प्रधानाला कुर्निसात केला. जमिनीला आपल्या हाताने वाकल्या मानेनें तीन वेळा स्पर्श केला.

' —कांहीं चिठ्ठी चपाटी ? '' चक्रदेवांनी तुळाजीला विचारिले.

तुळाजीने त्यांच्याकडे एकादा पाहिले—आणि नंतर नानांकडे पाहिले.

नानासाहेब त्याच्या या पहाण्यातला अर्थ उमजले. त्यानी खुणेने चक्रदेवांना तेथून दूर जावयास सांगितले आणि तेथून दूर गेल्यावर त्यानी तुळाजीला पुढें बोलावयाची खूण केली.

मग हलक्या आवाजात तुळोजी बोलू लागला. "आता श्रीमंत दोन तीन दिवसांचे सोबती. पुढे ते सूर्यमंडळ भेदून जाणार."

नानासाहेबांनी आपले डोळे मिटले.

"रघुनाथरावांना तिकडे घेऊन यावे असा श्रीमंतांचा निरोप आहे."

नानासाहेबांच्या कपाळावर आठ्या आल्या.

"...श्रीमंतांनी हा निरोप आपणासच सांगावयास मला सांगितले आहे. श्रीमंत म्हणाले, मरता मरता घरांत दुफळी ठेऊन मला मुक्ती मिळावयाची नाहीं. आणि श्रीमंत पुढे म्हणाले, पुढे मी गेल्या-नंतर आभाळावर आभाळे आलीं म्हणजे एकटे नानासाहेब कशा-कशाचा सांभाळ करतील. श्रीमंत म्हणाले, राक्षसभूवनच्या लढाईत हैदर वाघाशी हुज्जत घेणारे.हे हात आतां अभिषेकाचा गडू उचलताना थरथरतात..."

नानासाहेबांच्या पापण्या ओल्या झाल्या.

"आणि श्रीमंत म्हणाले, त्यातूनही हा नारायणराव हिंग असता तर कांहीं हरगीज नव्हती. परंतु अजून धाकट्या धन्याचे ध्यान बालसुलभच आहे. अजून उभ्या राज्याची जोखम त्यांच्या खांद्यावर टाकणे बरोबर होणार नाहीं."

नानासाहेबांच्या कपाळावर आठ्या आल्या.

आणि श्रीमंत म्हणाले दादासाहेबांच्या हातात धाकट्यांचा हात देवाब्राह्मणा समक्ष देऊन त्यांना शपथ घ्यावयास लावावयाची"

नानासाहेबांचे डोळे लाल झाले....

"...शपथ घ्यावयास लावावयाची मी नारायणरावाचे पुत्रवत पालन करीन."

नानासाहेबांनीं स्मित केले.

"आणि श्रीमंतांनी सारी व्यवस्था करून तुम्हाला ताबडतोब तिकडे बोलाविलें आहे."

नानासाहेबांनी ' मान्य' म्हणून मान हलविली.

"आणि बाईसाहेबाचा निरोप आहे.—" नानांच्या भिवया वर चढल्या.

" त्यांचा निरोप आहे की सती जातांना लागणारे सारे साहित्य येतांना नानासाहेबाना बरोबर घेऊन या म्हणावे. "

हे बोलता बोलता तुळाजीच्या डोळ्याला आसू डंख मारू लागले.

थोरा समोर उभे असतांना हे असे भावनाविवश होणे चांगले नव्हे हे तो जाणत होता. परंतु सागरातले तुफान आणि दारुण दुःख कोणी दाबू शकले आहे काय ?

...परंतु त्याची ही अवस्था नानासाहेबांनी जाणली आणि त्याला निरोप दिला.

साबाजीने नव्यादमाचा घोडा देवडीवर आणून ठेविला होता.

जसा तुळाजी आला तसाच तो थेऊरच्या दिशेनें वाऱ्याशी हुज्जत घालीत निघून गेला.



आकाशांत चंद्र नसावा तसे पेशवे पुण्यात नव्हते. गुलाबात गंध नसावा तसे पेशवे पुण्यांत नव्हते. गंगेत पावित्र्य नसावे तसे पेशवे पुण्यांत नव्हते. आईजवळ पान्हा नसावा, सिंहाजवळ शौर्य नसावे, वाऱ्याजवळ गती नसावी, कोकिळेजवळ कंठ नसावा, मोरपिसाऱ्यावर डोळे नसावेत, सरितेमध्यें वळण नसावे,—तसे पेशवे पुण्यांत नव्हते.

साऱ्या पुण्यावर औदासिन्याची छाया पसरली होती. आणि आज तर विशेषच गोंधळ उडून गेला. पुण्याहून थेऊरकडे सति जातांना लागतात तसली केशरी वस्त्रें कांहीं सांडणीस्वार घेऊन गेल्याची बातमी पुण्यात फुटली होती.

आणि त्या बातमीवरून पुष्कळांनी वेगळाच अंदाज बांधला

परंतु थोड्याच वेळांत ती आवई होती हे कळून आले आणि पुन्हां पुण्याची नाडी नीट चालूं लागली.

राघोबादादाना थेऊरकडे पाठवून देऊन त्याच्यामागून नानासाहेब तिकडे जावयास निघाले.

✦ ✦ ✦ ✦

पालखीचे भोई झपाझप पाय उचलीत होते. आणि आत बसलेले नानासाहेब विचार करीत होते. अनेक विचार त्यांच्या मनात पिंगा घालीत होते.

पुढें आता काय होणार आहे...माधवरावाचा मृत्यू तें आता गृहित धरून चालले होते. त्या पराक्रमी पुरुषाची सारी कारकीर्द त्यांच्या डोळ्यासमोरून एकाद्या मृगाच्या कळपासारखी धावत होती.

अवघ्या तेविसाव्या वर्षी राज्यसूत्रें हातात घेऊन आपली कारकीर्द धाकाने आणि प्रेमानें गाजविलेल्या या पेशव्यांच्याबद्दल नानासाहेबांच्या मनात अत्यंत आदर वसत होता.

पानपतावर परमेश्वरानें आभाळ फाडले तेंव्हा सर्व दक्षिण थरथरली; जरिपटक्याचें रंग उडाले.

मराठ्यांचा धाक नाहींसा झाला. माधवरावांचे हात नसते तर या वाढत्या संकटाच्या गोवर्धनाला कोणी सावरले नसते......

जे त्यांनी केले होते तें मोठे होते. आणि ते येवढे मोठे होते कीं तें त्यांच्या मरणानंतर उरणारे नव्हतें.

त्यांनी मांडलेल्या पसाऱ्याचा परीघ मोठा होता. मराठ्यांच्या ढाला तलवारी त्यांच्या नेतृत्वाखाली पुन्हा दिल्लीला आणि म्हैसूरला धाक दाखवून आल्या होत्या.

घरभेद्या चुलत्याचा निखारा अस्तनीत असतांना त्यानी आपली तलवार फिरविली आणि विजय मिळविले.

—खरेच ते अधिक जगावयास हवेत.

परंतु— !

✦ ✦ ✦ ✦

गणपतीच्या देवळांत राघोबादादा केव्हां येतात याची वाट पहातच माधवराव निजले होते. ते येतांच सारे मागले विसरून जाऊन त्याना त्यानी आपल्या जवळ बसविले.

सूर्य आतां अस्तास चालला होता. रात्रीचे नीलकमल आतां उलगडू लागले होते.

नारायणाचा हात दादासाहेबाच्या हातांत देत नानासाहेब प्रयत्न पूर्वक बोलूं लागले.

✦ :✦ ✦ ✦

त्यारात्रीं नानासाहेब माधवरावाच्या उशागती बसले. आतां त्या दोघांशिवाय तेथें कोणी नव्हते,

" आम्ही आतां क्षणाचे सोबती " माधवराव म्हणाले.

" आपण कांहीं काळजी करूं नका. " माधवराव धीर गंभीर स्वरांत म्हणाले.

" तुम्ही असल्यावर मला काळजी कसली ! माधवराव म्हणाले

" मी आहे ! " नानासाहेब म्हणाले.

✦ ✦ ✦ ✦

---

—२—

# प्रभु कोपला !

" आपण या गोष्टींत येवढे वर्दळीवर येण्याचें कारण नाहीं " नानासाहेब पेशव्यांची समजूत घालीत होते.

" ...आम्ही पेशवे आहोत, या बाबतींत आम्ही लक्ष घालावयाचे नाहीं तर कुणी ? " नारायणराव पेशवे म्हणाले.

" धर्माची ही बाब; थोड्या नाजूक रीतीनें हाताळावयास हवी. त्यासाठीं ही मारझोड कशासाठीं ? शिवाय ह्या आपल्या राज्याचा प्रचंड संसार उभा रहावयाला ह्या जमातींचे हात अनेकदा राबलेले आहेत. " नानासाहेब अल्लड पेशव्याला ' पेशवे ' पदाचा मान राखीत कांहीं सांगू पहात होते.

...त्याचें असें झालें होते कीं, पनवेलच्या एका प्रमुख प्रभु गृहस्थानें आपल्या मुलाची मुंज उघड रितीनें वाजत गाजत केली.

ही गोष्ट तेथल्या आणि पुण्यातल्या कांहीं कर्मठ ब्राह्मणांना आवडली नाहीं. असें झालें तर देवच कोपेल अशी त्या ब्राम्हणांची समजूत असावी.

त्यानीं या प्रकरणाची तड़ी लागली पाहिजे असा बाल पेशव्यांच्या मागे हट्ट धरला.

ते सारे कर्मठ ब्राम्हण पेशव्याकडे येऊन म्हणाले होते...

" हे लोक असें करूं लागलें तर मग श्रीमंत, आमचे तुमचे वैशिष्टय उरले कुठे ! आज यानी मुंजी केल्या, उद्या हे आन्हिके करूं लागतील. परवा हे दुसऱ्यासाठीं अभिषेकाची, आन्हिकाची, देवपूजेची कामें करू लागतील आणि आमच्या पोटावर पाय आणतील. याना आधिक पुढें जाऊन दिले तर उद्यां हे कोमटयाची, मराठ्यांची, कुलवाड्यांची, बारा बलुत्यांची, लग्नेहि लाऊ लागतील. आणि असं झाले तर मग ब्राह्मण्याचा दिमाख आणि डामडौल तो काय राहिला ! मागे द्वापारात असुर सुरासारखी तपश्चर्या करूं लागले. तेव्हा देवाने नानारूपें धारण करून वेळ प्रसंगीं घातपात करूनही देवाच्या देवपणाचे अधिकारांचे रक्षण करण्यासाठीं त्यांचा शिरच्छेद केला. "

ते लोक श्रीमंताच्या चरणी लागून म्हणाले होते,

" आपण गादीवर नसता तर गोष्ट वेगळी होती. मग आम्ही सारे अग्नीहोत्री ब्राह्मण कपाळावर हात मारून बसलो असतो. किंवा मागे मुसलमानांचे संकट आले त्यावेळीं अग्निकाष्टये भक्षण केली तसें कांहींतरी केलें असतें. परंतु आता दाद मागायला जायला आपल्यासारखे ब्रह्मतेज सिंहासनावर असतांना आम्ही आज का सोडावी ! छे छे आता आमची खात्री आहे कीं आपण यांत लक्ष घालाल. आणि आपण यात लक्ष घातलेत तर हे विषबिज जमीनीत रूजून त्यास फळें फुले यावयाच्या आतच त्याची राख होऊन जाईल. देवाने घालून दिलेल्या, धर्माने सांगितलेल्या नियमाचे जे उल्लंघन करतात त्यांचे जे पारिपत्य करतांत, त्याना सहस्र गोप्रदानाचे पुण्य आपल्या शास्त्रात सांगितलेलें आहे. '

ते लोक श्रीमंताच्या भेटीला आले आणि त्यांना हरबऱ्याच्या झाडावर चढवित म्हणाले,

" श्रीमंत आपल नाव आणि कीर्ति चहुकडे फांकली आहे. महादजी शिंदे थरथरा कापतात आपले नांव ऐकून. एवढे होळकर पण त्याना धाक आहे आपल्या नावाचा. आपल्या वाडिलाच्या वास-

छाती लावणारे दादासाहेब ते–ते देखिल आपल्यापुढें विनम्रभावाने बोलतात. एवढें पटवर्धन सरदार पण आपल्या तेजापुढे त्याची गत सूर्यापुढें समई ठेवावी तशी झालीं आहे. आपल्या हातानेंच उत्तरेस तुर्कस्तानापर्यंत, दाक्षिणेस मद्रास तंजावरपर्यंतचा मुलुख मराठ्याचा होणार ! आपल्याकडूनच निजाम मारला जाणार, आणि आपल्याकडूनच हैदरची सलतनत वादळातली होडी होणार. फिरंगी आपल्याच धैर्यशील हातानें सातासमुद्रापार लोटला जाणार."

ते स्वार्थी लोक श्रीमंताच्याकडे आलें आणि म्हणाले,

"या पेण पनवेलच्या ब्राह्मणांची नक्कल करणाऱ्या परभटांना मुसक्या बाधून पुण्यास बोलाऊन आणा आणि पुन्हां असे करणार नाहीं असें त्यांच्या कडून नव्हे, साऱ्याच प्रभू जमातीकडून कबूल करून घ्या."

पोर वयाच्या पेशव्याने मग त्या मुलाची मुंज लावणाऱ्या पेण पनवेलकडच्या श्रद्धाळू आणि बंडखोर प्रभू माणसाला मुसक्या बाधून पुण्यास धरून आणले.

आणि साऱ्या पुण्यांतील प्रभू जमातीला श्रीमंतांच्या करणीचा धक्का बसला.

श्रीमंतांनीं पुन्हा असें करणार नाहीं असें त्यांच्याकडून वदवावयाचा प्रयत्न केला परंतु—

—परंतु तो प्रभू गृहस्थही आपण केलें त्याबद्दल आग्रह धरणारा होता.

साम दाम, दंड, या तीन शस्त्राचे प्रयोग करूनही तो आपला हट्ट सोडीना.

आणि आता त्याच्या घरांतील साऱ्या मंडळींना वाड्यातल्या कारंजाच्या पलिकडल्या चौकातल्या सोप्यावर कानावर करकचून बाधण्यांत आले होते.

अन्न पाण्याचा स्पर्श त्या कुटुंबाला दोन दिवसापासून झाला नव्हता.

प्रौढ होते त्याच्या पाठी आसूडानें दहा बारा वेळा वाचपल्या होत्या. आणि वाड्यातला हा प्रकार साऱ्या पुण्याभर झाला होता! पुण्यातुल्या सरकारी कचेऱ्यातून कांहीं प्रभु मंडळी प्रमुख स्थानावर विराजमान होती.

त्यापैकीं कांहीं तर हा प्रकार ऐकून सुंद होऊन गेली.

केवळ ' मुंज ' केली या क्षुल्लक कारणासाठीं आपल्यातील एकाचे हे हाल श्रीमंतांच्या हातून होत आहेत....

वाहवा रे वाहवा....

ज्याच्या गादीच्या संरक्षणासाठीं आम्हीं आजपर्यंत कायावाचामनें करून राबलो...लढलो--

--खरेच पेशवा पोर आहे...

खरेच पेशवा दुर्दैवी आहे....

खरेच हा नारायणराव हे कांहीं तरीच करतो आहे...

आणि मग त्यांतल्या काहीं मंडळींनी नानासाहेबाची भेट घेतली.

आणि मग नानासाहेब नारायणरावाच्या भेटीला आले.

आरंभाला सुरू झालेल्या संवादाचे सूत्र हे असे होते.

"असल्या बाबतींत आम्ही तुमचे कांहीं ऐकणार नाहीं. या राज्यांत ब्राह्मणांचे नांव देवाबरोबर घेतले जाते. त्यांचा कोप आम्ही आमच्यावर ओढऊन घेणार नाहीं." श्रीमंत, तुळाजीनें पुढें केलेल्या तस्तात पीक टाकीत म्हणाले.

यावर नानासाहेब कांहींच बोलले नाहींत. नानासाहेबाच्या मनाला आपण करतो ही गोष्ट पटत नाहीं हे श्रीमंताना आतांच कळले होते. आतां पावेतो त्याची अशी समजूत होती कीं धर्माबद्दल प्रेम बाळगणारे आणि वृत्तीनें कर्मठ असणारे नानासाहेब आपल्याला या बाबतींत शाबासकी देतील.

...परंतु आतां नानासाहेबांना हे रुचले नाहीं हे कळून आल्या-नंतर त्यांना थोडा खेद वाटला.

परंतु एकदां पुढें टाकलेलें पाऊल मागें घेतलें तर आपल्याला आपले आवती भवतीचे लोक नानासाहेबाच्या ताटाखालचे मांजर म्हणतील असें त्याला वाटले.——

पुढें पावले टाकण्यांत जेवढा पराक्रम असतो त्याहून फार मोठा पराक्रम शिस्तीने आणि धोरणानें आपली पिछेहाट करणाऱ्याच्या अंगी असावा लागतो.

आपले अंदाज चुकताच—जे मार्ग बदलावयास प्रवृत्त होतात तेच जगांत काहीं कामे करून जाऊं शकततात.

ज्यांची चाल गेंड्यासारखी असतें त्यांना वाघ सिंहाचा विक्रम करतां येत नाहीं.

ज्या जाण्याला परत येणें ठाऊक नसते ती वाट आत्मघाताचीच असते.

आणि नानासाहेबाना हे दिसत होते. अलिकडे चारपांच महिने त्यांना कळून चुकले होते कीं श्रीमंत...!

परंतु आपल्या कर्तबगारीवर, आपल्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास होता. सर्व प्यादी मारली गेली, सर्व दाने उलटी पडली तरी ही पेशव्याची गादी भंगून द्यावयाची नाहीं असा कृतनिश्चय त्यानी केला होता.

“ मला सुचले ते मी आपणास सांगितले. आज माझ्याकडे काहीं प्रभु आले होते. येथे दाद लागली नाहीं तर याची दाद मागाव-याला मंडळी सातारला जातील. ” नानासाहेब श्रीमंतांना म्हणाले.

“ तुळाजी ! विडा ! ” श्रीमंत म्हणाले.

मग विडा चघळत चघळत नानासाहेबांकडे न पहाता ते म्हणाले,

" हे पहा आम्ही पेशवे आहोंत ! त्या मंडळींनीं हवे तर ब्रम्हांड पालथे घालावे. पाटीलबाबाना पाठीशी घातले तरी आम्ही आहोत तसेच रहाणार. "

" परंतु ही मारहाण ! "

नानासाहेब बोलूं पहात होते त्यांना मधेंच थांबवून श्रीमंत पुढें बोलूं लागले.

" पाठीच्या चिंध्या केल्या त्याच्या, कबुल. उद्या मी सांगतो तसे वागले नाहींत तर डोक्यात मेखा मारून वाड्यासमोर ठार मारीन मी त्याना. आम्हाला सांगावयाला आलांत तसे तिकडे जाऊन त्यांना कां सागत नाहीं कीं श्रीमंत काय म्हणंतात तें कबूल करा. "

यावर बराच वेळ विचार करून नानासाहेबांनीं उत्तर दिलें.

" होय ! श्रीमंत, मी त्यांना जाऊन सांगतो कीं... "

" सांगा कीं आम्ही पुढे केलेल्या कागदावर सही करा; ! " श्रीमंत म्हणाले.

" सांगतो ! मी त्यानांच जाऊन सांगतो. " नानासाहेब म्हणाले.

मग श्रीमंत हसले. बैठकीवरून तें उठलें. त्यांनी तबकातली अत्तरदाणी घेतली आणि आपल्या हातानें नानासाहेबांना अत्तर गुलाब दिला.

नानासाहेबांनी आपले हात श्रीमंतांच्या खांद्यावर ठेवले आणि...

"--श्रीमंत आम्ही तुमच्या पायाचे चाकर आहोत. विनंती येवढीच आहे-ज्या साठीं आम्ही आपले अन्न खातो ती कामे आपण आमच्यापासून करून घ्यावींत. '

" काय म्हणणे आहे ? ' श्रीमंत दुसरा विडा खात म्हणाले.

" म्हणणें ऐवढेंच कीं असली प्रकरणें पुन्हा उपस्थित झाली तर त्याची दखल घेण्याचें काम आमच्या अंगावर टाकावे. " नानासाहेब म्हणाले.

"मंजूर !" श्रीमंत म्हणाले. शनिवार वाड्यांतून बाहेर पडतांना नाना विचार करीत होते.

ते विचार करीत होते की या अल्लड पेशव्याची कारकीर्द किती वर्षांची होणार आहे ?

सूर्यावर आता काळे ढग आले होते. आपल्या भोंवती अंधार येत आहे याची त्याला जाणीवही नव्हती.

ग्रहण काल जवळ येऊन ठेपला आहे याची पुसटतीही कल्पना त्याला नव्हती...

आणि ग्रहण लागताच दान मागावयासाठीं बाहेर पडणारे भिकारी ते ..ते...ते मात्र आपल्या झोळ्यांच्या फडक्याना गांठी मारू लागले होते.

———

— ३ —

# दिवा मालवला !

"तुळाजी ! नेहमीच तूं श्रीमंताजवळ सावलीसारखा असतोस परंतु आतां तुला यापुढें जास्त जागरूक असावयास हवे."

नानासाहेब बोलत होते आणि तुळाजी ऐकत होता.

"वाड्यातल्या दादासाहेबांच्या हालचालीकडेहि तुला अधिक लक्ष ठेवावयास हवे"

तुळाजी ऐकत होता.

"शक्यतर तिकडली नोकर मंडळी इकडे न येतील अशीच तजवीज करा."

यानंतर तुळाजीला नानासाहेबांनीं निरोप दिला.

त्यानंतर ते खलबतखान्यांत गेले. तेथें त्रिंबकराव पेठे, हरिपंत फडके, येऊन नानासाहेबाचीच वाट पहात बसले होते.

त्याचवेळीं दुसरीकडे सखाराम बापूंच्या दिवाणखान्यात चिंतो विठ्ठल, आणि दादासाहेबाचे एक विश्वासातले कारभारी कांहीं चर्चा करीत बसले होते.

त्यावेळच्या पुण्यातल्या राजकारणांतली ही दोन्हीं बाजूंचीं मंडळी परस्परांच्यावर 'बुर्जो' करण्यात गुंतलेली होती.

उघड उघड दोन पक्ष त्यावेळी पुण्यांत उत्पन्न झाले होते. एक दादासाहेबांचा आणि एक नारायणराव पेशव्यांचा !

थेऊरला घेतलेल्या आणाशपथा आतां दादासाहेब विसरावयास लागले होते. आणि त्यांच्या वृत्तीतला हा बदल होताच नारायणरावांनी त्याना सहकुटुंब वाड्यांतल्या वाड्यातच एका वेगळ्या जागीं नजर कैदेत ठेविले होते.

या नजरकैदेंत असतांनाच त्याची कारस्थानें सुरूं झाली होती. आणि...

हैदरअल्लीकडे एक माणूस रवाना झाला. निजामाकडे बोलणें करावयासाठीं दुसरा एक माणूस रवाना झाला.

आणि दादासाहेबांचे हस्तक अशी महत्वाची हालचाल करीत असतांना स्वतः श्रीमंत...!

◆ ◆ ◆ ◆

" हरिपंत, ह्यावेळी प्रसंग फार बांका आहे. दादासाहेबांच्या वाड्यावरला पहारा अधिक कडक करा ! " नानासाहेब हरिपंत फडक्यांना म्हणाले.

" ते कसे शक्य आहे ? मी माझ्याकडून कुणाला न दुखविता जेवढे कडक पहारे ठेवणें शक्य होतें तेवढे ठेवले आहेत. खुद्दांच्या देवडीबाहेर हल्ली गारद्याची तुकडी आहे. श्रीमंतांच्या तैनातीतल्या सुमेरसिंग आणि खरकसिंग यांनी निवडून दिलेले गारदीच हल्ली दादासाहेबांच्याकडील पहाऱ्याला आहेत. " हरिपंत म्हणाले.

या गारदी लोकांची वर्णी त्या कालखंडात पेशव्यांच्या राजधानीत ठिकठिकाणीं लागली होती. याचे कारण असे होतें कीं जुन्या मराठा सैनिकाना अनेक दिवसांचे पगार मिळाले नव्हते.

माधवरावाचे देहावसान झाले तेव्हां त्यांच्या नांवाच्याच किती तरी लाखाच्या हुंड्या सावकाराच्याकडे पडल्या होत्या.

अखेरच्या घटकेला नानासाहेबांच्या सांगण्यावरून दरेकरांनी त्या साऱ्या आपल्या नावावर चढऊन घेतल्या आणि दरेकरांनी दाखव-

ल्या या कर्णांच्या दातृत्वाच्या बळावरच माधवरावांचा प्राण निष्कर्ष अवस्थेंत परलोकी प्रयाण करिता झाला.

नोव्हेंबर सतराशे बहात्तरमधें माधवराव गेले आणि आतां जुलै-संपून ऑगष्ट सुरू झाला होता.

आणि चालू साल इसविसन सतराशे त्र्यहात्तर होतें,—श्रीमंत माधवरावांच्या मृत्यूच्या पुढचेंच हें वर्ष होतें.

घरांतल्या घरात आनंदीबाई कारस्थान करीत होती. राघोबादादाच्या या पत्नीचा स्वभाव फार धोरणी होता. कारस्थानाला योग्य असे बुद्धिबळहि तिच्यापाशी होते.

आपल्यावरला मराठी शिपायाचा पहारा नाहींसा झालेला पहाताच प्रथम मी बिचकली कारण या मराठी शिलेदारांपैकी कांहींना तिनें पैसा देऊन फितवले होते.

नंतर——?

हे गारदी आले

आणि मग ती पुन्हा विचार करूं लागली.

✦ ✦ ✦ ✦

या गारद्याच्या फलटणीवर त्यांचा पगार वाटावयाला, त्यांची हजेरी ठेवावयाला ज्या दोघा कारकुनाची नेमणूक झालेली होती ते जातीनें प्रभु होते.

आणि पुढें आनंदीबाईला चौकशीअनी असेहि कळून आले कीं पेण पनवेलच्या ज्या प्रभूंची चामडी श्रीमंतानी आसुडाने रक्ताळून टाकली—त्याचे आणि या कारकुनाचे लाबचे नाते पण लागते——

आणि मग आनंदीबाई पुन्हा विचार करूं लागली.

✦ ✦ ✦ ✦

सान्याना निरोप देऊन मग नानासाहेब पुन्हां आपल्या खासगत महालाकडे गेले. त्याना तेथे जाऊन फार वेळ झाला नाहीं तोच

श्रीमंतांच्या मातोश्री गोपिकाबाईंच्या कडून त्यांचा निरोप घेऊन एक कुणबिण त्यांना बोलवावयासाठीं आली.

मग नानासाहेब तिकडे गेले.

" आईसाहेब, काय ? "

समोरच्या पाटावरील शनि महात्म्याची पोथी दासीला आवरावयास सांगून गोपिकाबाईनी नानासाहेबांनी केलेल्या वंदनाचा स्वीकार केला.

" बसा ! " त्या म्हणाल्या.

मग साऱ्यांना त्यांनीं दूर जावयास सांगितलें.

मग त्या म्हणाल्या.

' काल गुरुचरित्र वाचीत बसले होतें मी—वाचता वाचता माझा डोळा लागला. आणि मला स्वप्न पडले.– –"

नानासाहेबांच्या भिवया कपाळांत घुसल्या

"मला स्वप्न पडले कीं साऱ्या वाड्याला आग लागली आहे. मुख्य दिवाणखान्यातल्या ब्रह्मेंद्रस्वामींच्या चित्रातील गळ्यातल्या हारातील फुले कोमेजून गेली आहेत. मी नदीवरून कळशी भरून घेऊन ती आग विझवावयासाठीं येऊ लागले तों वाटेत आनंदीबाईनी मला गांठले. त्यांनी माझ्या हातातली भरलेली कळशी हिसकाऊन घेतली. आणि ओतून टाकून दिले त्यातले पाणी मग मी तेथेच मार्गांत रडत बसले. बराच वेळ मी अशी बसले तों धावत धावत नारायण तिकडून वाड्याकडल्या बाजूनें माझ्याजळ मी बसलेली होते तेथे आला. त्यांनी मला उठवले. माझे डोळे पुसले. मग त्याचा आधार घेत परत वाड्याकडे आले तों तुम्ही सारी आग विझऊन टाकलेली होती. मग मी देवघरांत गेले आणि पहाते तों गजाननाच्या समोरचा अनेक वर्षे तेवत ठेवलेला नंदादीप अगदी मालवलेला होता. घाईघाईनें मी तो लावला. आणि पुन्हा प्रकाश पडतांच पाहू लागले तों श्रीमंत जवळ

नव्हते. माझ्या मागे कुणाची तरी चाहूल लागली म्हणून पहाते तों दादासाहेब आणि आनंदीबाई हंसत उभ्या होत्या. आनंदीबाईंनी मळवट भरला होता. केस मोकळे सोडले होते. हातातली घागर त्या फुंकत होत्या. आणि त्यांच्या काळ्या चंद्रकळेचा पदर रक्तानें माखलेला होता. मी त्यांना विचारलें, बाई ! हे काय करता ? त्यावर न बोलता त्या हंसल्या आणि पुन्हा घागर फुंकू लागल्या. तशा त्या फुंकत असतानांच त्यांच्या त्या फुंकण्याच्या वाऱ्याने पुन्हा नंदादीप मालवला गेला. आणि पुढें मी जागी झाले. " येवढें बोलून गोपिकाबाई थांबल्या.

नानासाहेबांनी सारे ऐकून घेतले, शांतपणे ऐकून घेतले. आणि ते काहींच बोललें नाहींत.

" याचा—या स्वप्नाचा अर्थ काय ? ' त्यांना बाईंनी विचारले.

"——या स्वप्नाचा अर्थ काय हे द्रविडाना विचारून तुम्हास सांगतो. स्वप्नाचा अर्थ त्यांना चांगला लावता येतो." नानासाहेब म्हणाले.

"—विचारा——लवकर त्यांना विचारा, आणि त्यांना सांगा नंदादीप—वाड्यातला अखंड तेवता ठेवलेला नंदादीप—स्वप्नांत दोनदा मालवलेला दिसला. ' बाईसाहेब म्हणाल्या.

" विचारतो " असे म्हणून नानासाहेबांनी मातोश्रींचा निरोप घेतला.

आपल्या घरांकडे परत जावयाच्या आधीं त्यानी वाड्यातल्याच एका चाकराला खुन्यामुरलीधराच्या बाजूला द्रविडांकडे पाठऊन दिलें.

———

—४—

# आभाळ उसवले गेलें

बुल्बुलाला गिधाडांनी गराडावें तसे गारद्यांनीं श्रीमंतांना वेढले. आणि मग श्रीमंत धांवत सुटले. काकांच्या आश्रयास गेल्यास आपला प्राण वांचेल असें त्यांना वाटलें.

परंतु गारदी आतां धुंद झाले होते. घोटा पिऊन ते आलेले होते. त्याचे ' भान ' आतां त्याच्या मेंदूच्या ताब्यांत नव्हते.

दादासाहेबांनीं त्याना रोख दोन लाख रुपये दिलें होते आणि आपण गादीवर येताच तुम्हांस आणखीं पाच लाख रुपये आणि साष्टीचा, पुरंदरचा आनि नगरचा किल्ला देण्याचेंहि कबूल केले होते.

आणि मग गारद्यांनीं दादासाहेबांच्या गळयाला मिठी मारलेल्या श्रीमंतांना त्यांच्यापासून तंगडी धरून खसकन ओढून काढलें...

आणि त्यावेळीं धन्याचा प्राण वाचावा म्हणून तुळाजी मध्यें पडला...

...आणि त्याच्या देहाचे तीन तुकडे झाले!

...आडव्या आलेल्या गाय वासरांचीहि गारद्यानी कत्तल केली! एकाद्या कडक लक्ष्मीसारखे ते सैरावैरा करीत होते.

" सुमेर! ' खरकसिंगानें हाका मारली.

" काय? " सुमेरनें विचारले.

"दादासाहेब म्हणतात श्रीमंतांना सोडा !" खरकसिंग म्हणाला

" आता याना सोडावयाचे कसें ? आता याना सोडले तर... तर हा गरम तब्येतीचा पेशवा आपल्याला हत्तीच्या पायाखालीं देईल. आपल्या बायकापोरांची चाबकानें चामडी लोळवील पुण्यातलीच काय परंतु उत्तर हिंदुस्थानातली गारद्याची जात तो नाहींशी करून टाकील. थोराथोरांच्या राजकारणात पुढें दिलजमाईचा वख्त येईल आणि मग आपल्याला फुकट प्राण गमावावे लागतील. आतां दोन मालिक असतांच कामा नयेत..." सुमेरसिंग म्हणाला.

त्याच्या हातातल्या नागव्या तलवारीच्या धारेवर दोनतीन गाईंचे आत्मे नाचत होते.

त्याच्या हातातल्या नागव्या तरवारीच्या पात्याला श्रीमंतांच्या इमानी चाकराचे चटके बसलेलें होतें.

मग खरकसिंग पुढें झाला....

मग सुमेरसिंग पुढें झाला...

आणि कड्यावरून कलिंगड खालच्या फत्तरावर पडतांच त्यांतल्या लाल जर्द गीराबरोबर बी त्रियाण्या छपन्न ठिकाणीं उधळाव्या तशा...

दहा ठिकाणी श्रीमंत तुटले गेले ! !



राजमाचीकरांनी रात्री वाड्यातले तीन ठिकाणी पडलेले 'श्रीमंत' जमा केले. रात्रीच्या रात्री नदीतीरावर जाऊन त्या प्रेताला अग्नी द्यावयाची कामगिरी त्यांच्याकडे होती.

सारे तुकडे जमा करून ठेवल्यानंतर ते कांहीं कामानिमित्त थोडेसे तेथून दूर झाले होते. परत येऊन पहातात तो त्या प्रेतावर त्यांना कागदाचें कपटे पडलेलें दिसले. त्यानी ते सारे कपटे एकत्र करून वाचून पाहिलें.

कांहीं वेळानें त्या कपट्यांचा अर्थ त्यांना लागला. सारे कागद जमा केल्यानंतर त्यांना वाचतां आले,

त्यांनी वाचले...... !

" कोणाच्या मृत्यूला कोणीहि जबाबदार असो, परंतु एवढें खरें कीं कुणाच्या मरणानें कुणाला दुःख होते आणि कुणाला आनंद होतो."

कुणाला आनंद झाला होता !

श्रीमंत नारायणरावाच्या खुनामुळें ज्याच्या आत्म्याला समाधान झालें अशा त्यांच्याकडून छळवणूक झालेल्या प्रभुजमातींतील कांहींनीं तें कागदाचे कपटे त्याच्या अंगावर टाकले होते.

ते कपटे त्या कागदांचे होते कीं जो नारायणरावांनीं त्या जमातीला मारहाण करून ब्राम्हणांच्या नादाला लागून लिहून घेतला होता...!

त्या कागदाचे ते कपटे त्या प्रेतावर उधळले होते कीं ज्यावर अनेक प्रभुंनी आम्ही--

१. मुलांची मुंज करणार नाहीं.

२ आम्ही श्रावणी करणार नाहीं.

३ आम्ही ब्राह्मणाचे ऐकू...इ. असें लिहून दिले होतें.

नारायणरावाना धरावे असा कट दादासाहेबांनीं राज्यलालसेनें केला. आनंदीबाईनी त्या कटाला रंगारूपाला आणावयाला मदत केली.

तिने मदत केली असे म्हणावयाचे कारण असें कीं वाड्यांत नजरकैदेत असणाऱ्या दादासाहेबाना इकडे तिकडे हालचाल करावयास मोकळीक नव्हती.

जेवढा कडक बंदोबस्त दादासाहेबांच्यावर होता तेवढा बाई-माणूस म्हणून अर्थातच आनंदीबाईवर नव्हता.

सखारामबापूंची, रायरीकरांची उघड उघड भेट आनंदीबाईला कधींच घेतां आली नाहीं.

नानासाहेबांच्या जागत्या नजरेतून ती गोष्ट सुटणेच शक्य नव्हते.

मग हा कट शिजणें कसें शक्य झालें ! खरेंच कसें शक्य झालें !

✦ ✦ ✦ ✦

पुण्याला जोगेश्वरीचें देऊळ आहे. आणि त्या देवीच्या देवळाजवळच त्या वेळेला हे गारदी रात्रीचे मुक्कामाला असत.

आनंदीबाईने या देवीच्या दर्शनाला यावयाचा नित्याचा परिपाठ ठेविला होता.

या देवळाच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर मागल्या बाजूला मोरोबादादांचा वाडा होता. या देवळाच्या मागल्या बाजूनें त्या वाड्यात जाता यावें अशी एक गुप्त चोरवाट त्या सुमाराला पाडण्यांत आली होती.

दिवसा ती वाट कुणाच्या ध्यानात येऊं नये म्हणून एक मेणा त्यापुढें आणून ठेवण्यांत आला होता.

प्रत्यक्ष 'ये जा' किती झाली कुणास ठाऊक त्या वाटेने, परंतु...

परंतु प्रदक्षिणा घालतां घालतां आनंदीबाई बरोबरच्या कुळंबिणीच्याहि ध्यानात येणार नाही अशा धांदलीनें काही चिट्याचपाट्या त्या मेण्यात टाकत असे.

पहाऱ्यावरले गारदी तर पैशानें विकत घेतले गेलें होते.

गारदी परप्रांतातले होते. त्याना 'पेशवाई' पदाबद्दल किंचितही सोयरसुतक नव्हते. त्याना पैसे हवे होते.

आणि त्यांचा पगारही थकला होता. पगार थकला कीं धरणें धरून दारापाशीं गिल्ला करीत बसावयाची त्यावेळीं पद्धतच होती.

न जेवता न खाता फलटणीच्या फलटणी सेनापतीच्या दारांत धरणें धरून 'बाकी चुकती करा' असा हट्ट धरून बसत.

म्हणून गारदी जेव्हा त्या दुपारच्या वेळीं वाड्यात दंगा करीत घुसले तेंव्हा प्रथम त्या गिल्यामागे 'श्रीमंतां'च्या प्राणावरचें अरिष्ट छपलेले असेल असे कुणालाच वाटलें नाही.

द्वारावरले पहारेकरी त्या गारद्याच्या तुकडीला आत सोडीनात. इथें आपले काहीं चालणार नाहीं असे पहाताच सुमेरसिंग परत मागे फिरला.

मस्तानी दरवाज्याच्या जवळ तटाला लागून हिरव्या चाफ्याचे एक झाड होते. त्या झाडावरून ते सारे भराभर तटावर उतरले आणि मग तटावरून धांवत धांवत जाऊनच त्यांनी श्रीमंतांच्या दिवाणखान्यावर झेप घेतली.

विजेसारखें ते अकल्पित तेथे येऊन पोचले. मार्गांत जें जें आडवे आले तें तें त्यानी शतखंडित केलें.

दया आणि माया यापासून तें दहा हात दूर चालले होते. आणि सारी खून–खराबी करून झाल्यानंतर त्यानीं आपल्या हातांनीं राघोबादादाला दरबारच्या दिवाणखान्यात जवळ जवळ ओढीतच नेलें.

त्याला सिंहासनावर बसऊन त्यांनीं वाड्यातल्या अलम वस्तीला त्यांच्या नांवाच्या धाकाने जयजयकार करावयास लावला.

माणसांच्या बद्दलही त्यांना दयामाया नव्हती. आणि देवांबद्दलही नव्हती.

त्या धांदलीत त्यांनी वाडा उलथापालथा केला. त्यानीं देव-घरांतले सोन्याचे देवही लुटावयास कमीं केले नाहींत !

याचा अर्थ करता येईल तो असा कीं हा 'कट' करणारी जरी 'माणसें' होती तरी त्या कटासाठीं ज्याची मदतीसाठीं निवड करण्यांत आलेली होती ती काहीं...

ती काहीं माणसें नव्हती. त्या खुनाच्या दिवशीं त्या नरपशूंनी दिल्ली जिंकणाऱ्या पेशव्यांच्या राजधानीच्या वाड्यांत जें जें प्रकार केलें....

त्या गुन्ह्यांना मर्यादा माहीत नव्हत्या.



"नानासाहेबांना दादासाहेबांनी आत्तांच्या आत्तां बोलाविले आहे."
चक्रदेवांना सखारामबापू सांगत होते...

"कशासाठीं?" चक्रदेवांनी चौकशी केली.

यावर सखारामबापू कांहींच उत्तरले नाहींत.

मग चक्रदेव तेथून दूर झाले.

काहीं वेळाने ते परत आले तेंव्हां नानासाहेब त्यांच्याबरोबर होते.

वाड्यांत धाकट्या पेशव्यांचे रक्त सांडून आता अनेक दिवस लोटलें होते.

सखारामबापूंचा हात या खुनाच्या प्रकरणात कांहींसा गुंतलेला असावा असा संशय नानासाहेबाकडील पुष्कळ मंडळींना येत होता.

परंतु नानासाहेब आणि ते आतां मागलें सारे विसरून जाऊन एका कारस्थानात मग्न झाले होतें.

खुनानंतर राघोबादादानें पुण्याहून मोहिमेंसाठी कूच केले. गाड्याबरोबर नळे, तसें हे सारे 'लोक' त्यांनी आपल्याबरोबर प्रथम घेतले.

मग कांहीं मुक्काम केल्यानंतर प्रकृतीची सबब सांगून बापू परत पुण्यास आले.

मग काहीं मुक्काम केल्यानंतर नानासाहेबांना अमांशाची व्यथा झाली...ते पुण्यास आले.

मग चंद्रचूड आले, मग चक्रदेव आले, मग पेठे आले, मग फडके आले, मग पटवर्धन आले...

आज ते सारे एकत्र आले होते. राघोबादादा आता पुण्यांत नव्हते आणि ...?

हे सारे 'बारभाई' कारस्थान करीत होते. राज्यलोभासाठी

पुनण्यांचा खून होण्यासारखी परिस्थिती निर्माण करावयास कारणीभूत होणाऱ्या दादासाहेबांना पेशवेपदावरून हुसकून लावावयाचा ते प्रयत्न करणार होते.

नारायणराव पेशव्यांची पत्नी गंगाबाई गरोदर होती. तिचा प्रसुतीकाल अजून लांब होता.

तिला पुत्ररत्न झालें तर सारे सोईचे होणार होते. मग त्या मुलाला पेशवेपद देऊन त्याच्या नांवानें या बारभाईंनीं राज्यकारभार चालवावा असें ठरले होतें.

आणि दुर्दैवानें तिला कन्या झाली तर ?

✦ ✦ ✦ ✦

या प्रश्नाचे उत्तर मागण्यासाठीं बापूंनीं आज नानासाहेबांना निरोप पाठविला होता.

" तसे झालें तर दत्तक कुणाचा घ्यावयाचा ? बापूंनीं विचारलें.

त्यावर नानासाहेब विचार करूं लागले. बराच वेळ ते विचार करीत होते.

कांहीं वेळानें त्यांचा कांहीं निश्चय झाला. मग तें बापूंना म्हणाले.

" बापूसाहेब ! देवानें मला दृष्टांत दिला आहे कीं आता सारी संकटें संपलीं आहेत. नसते तर्क कुतर्क करून घेऊं नका आता.फक्त ?....

" फक्त काय ? बापूंनीं विचारले.

" बाईंची रवानगी पुरंदरास करा "

नानासाहेबांनी सांगितलें...

—०—

—५—

# कट्यारीवरलें लिंबू

पतीचा खून झालेल्या गंगाबाईची स्थिति आरंभी अगदीं केविलवाणी झाली होती. खुनानंतर तिने सती जावे असा आग्रह आनदीबाईनें तिला करून पाहिला.

वाड्यांतल्या वाड्यात जेवढा तिचा छळ करतां येणें शक्य होते तेवढा आनंदीबाईने केला.

नारायणराव मारले गेलें, पेशवे आपल्या प्रजेला पोरके करून देवाघरी गेले हे वृत्त तिच्या प्रथम कानावर आले तेव्हां ती दासदासींच्या परिवारांत बसून वाड्यांतल्या गच्चीवर तिच्यासाठीच खास करण्यात येत असलेला ' भागा ' बाईचा खेळ पहात होती.

ज्या वेळेला घाबरत घाबरत धावत आलेल्या दासीने तिला ते वृत्त सांगितळे तेव्हा ती खेळातली ' माकडीण ' नवऱ्याजवळून माहेरीं जावयास परवानगी मागत होती.

पोरवयाचीच म्हणता येईल अशी गंगाबाई तो खेळातील प्रसंग पहाताना खदखदून हंसत होती.

येवढ्यांत धावत धावत धापा टाकत टाकत एक दासी आली.

ती आली ती तशी आलेली पाहून ते खेळ करणारे जनावर बिचकले.

आणि काहीं वेळानें तेथला सारा परिवार बिचकला.

मूर्च्छा येऊन पडलेल्या गंगाबाईला दास दासी विंझणवारा घालून शुद्धीवर आणू पहात आहेत तोंच खालून आनंदीबाई वर आली.

तिच्या बरोबर चार गारदी होते. त्या गारद्यांनी धाक दाखवून साऱ्या दासींना तेथून हाकलून दिले.

गजरा नांवाची एक दासी आपल्या धनिणीवर निष्ठेने प्रेम करणारी होती. ती तेथून हलेना. तिच्या हातातला पंखा आनंदीबाईने हिसकाऊन दूर फेकून दिला तेव्हां ती आपल्या धनिणीला पदरानें वारा घालूं लागली.

मग आनंदीबाईचे डोळे लाल झाले. मग गारद्याच्या हातातली तलवार हवेत तळपळी...

आणि मग 'गजऱ्या' तली प्राणाची पाच फुलें विस्कटली गेली, पाला पाचोळा झाला !

कांहीं वेळानें गंगाबाई शुद्धीवर आली आणि पहातें तो आपल्या अंगावरचे हिरवे वस्त्र दासी सोडून टाकीत आहेत आणि केशरी वस्त्र नेसवित आहेत असे तिला दिसले !

कांहीं वेळानें आनंदीबाईने स्वतःच्या हाताने तिला भांग घ्यावयास दिली. नंतर ती तिला चढूं लागतांच तिचा मळवट आनंदीबाईने भरला. अम्रफुले, आणि मुदा घालून सजविलेली गंगाबाईची वेणी आनंदीबाईनें आपल्या हातानें सोडली.

मोकळे झालेले केस तिच्या पाठीवर सैरावैरा सोडून दिले. मग आनंदीबाईनें तिचा हात धरून तिला उभी केली.

कांहीं वेळानें शोकाच्या आणि भांगेच्या गुंगीत चालत असलेली गंगाबाई मागल्या चौकांतल्या माजघरांत येऊन पोंचली.

मग आनंदीबाईनें तेथें असलेल्या गारद्याना एका बोचक्यावरली पादरी चादर दूर करावयास सांगितली.

मग गंगाबाईनें पाहिले...

श्रीमंताचे मुंडके त्यांत होतें. आणि श्रीमंताचे हातपाय त्यात होते...

ते दृश्य पाहून गंगाबाईला पुन्हा मूर्च्छा आली. कांहीं वेळानें तोंडावर पाणी मारून आणि कांदा हुंगावयास देऊन तिला आनंदी-बाईनें शुद्धीवर आणलें.

ती शुद्धीवर आली आणि रडावयाचा प्रयत्न करूं लागली. पण आतां तिच्या डोळ्यांनाही मूर्च्छा आली होती.

हर्ष आणि खेद यांतला अर्थ आतां त्या डोळ्यांना उलगडता येत नव्हता. मग कांहीं वेळानें ती त्या बोचक्याकडे पाहून हंसू लागली !

वेड्यासारख्या हंसणाऱ्या गंगाबाईकडे पाहून आनंदीबाईला संताप आला.

" परंपरेप्रमाणें तुला सती जावयास हवे—कळलें. " ती गंगा-बाईला म्हणाली.

" कळलें ! " गंगाबाई म्हणाली.

" मग तूं जाणार सती ? " आनंदीबाई म्हणाली.

" होय. मी आनदानें सती जाईन. हे गेल्यानंतर मला तरी जगून काय करावयाचे आहे. " गंगाबाई उत्तरली.

" मग करावयाची तयारी ? "

" करा ! परंतु थांबा ! हे पहा सती जावयाच्या आधीं मला नानासाहेबांना काही सांगावयाचे आहे. श्रीमंतांनी...माझ्या पतींनीं... माझ्याजवळ एक निरोप त्यांना सांगावयासाठीं ठेविला आहे तो त्याना सांगितल्याशिवाय मी सती जाणार नाहीं. तसे मी केले तर वर गेल्यानंतर स्वर्गांतही माझे राया मला दूर लोटतील. "

गंगाबाई निश्चयपूर्वक स्वरांत म्हणाली.

" ते शक्य होणार नाहीं. ज्यानें आमच्याशीं वैर धरलें, ज्यानें येवढ्या घराला आम्हाला गोष्टी आणण्यास लावल्या त्या नानासाहेबाला मी वाड्यांत पाऊल टाकून देणार नाहीं " आनंदीबाई म्हणाली.

" तसे होणार नसेल तर माझे हाल हाल केलेत तरी मीहून सती जाणार नाहीं. तुम्हाला हवे तर गारद्यांकडून त्यांना कापविलेत, माझ्या गजरेला तोडलेंत तसें माझे कांहीही करा. तोंडातून ब्र ही काढणार नाहीं. " गंगाबाई म्हणाली.

" पाहून घेईन " आनंदीबाई म्हणाली. मग तिने लत्ताप्रहार करून गंगाबाईला खाली पाडले. तिला आपल्या हातातें तिनें नाजूक जागी चिमटे घेतले. नंतर तिचे केस धरून तिनें तिला फरपटत दादासाहेब बसलें होते तेथे नेलें.

ते तिचे वर्तन पाहून दादासाहेबांशी बोलत बसलेल्या सुमेरसिंगालाही राग आला. परतु तो कांहीं बोलला नाहीं.

" हे काय करता आहात तुम्ही ? " दादासाहेब आनंदीबाईला म्हणाले.

" तुमची ही सून सती जात नाहीं म्हणते... आहे. " आनंदीबाई गंगाबाईला आणखीन एक लाथ हाणीत म्हणाली.

" आता असें कांहीं करू नका ! तुमचे खाजगत राग असे उगऊ लागाल तर सारे राजकारण बिघडऊन टाकाल. " दादासाहेब म्हणाले.

" ही म्हणते आहे कीं तुमच्या आमच्या वैऱ्याची आणि तिची गांठ घालून द्या. " आनंदीबाई गंगाबाइचे केस ओढीत म्हणाली.

तिचे हे वर्तन पाहून मग सुमेरसिंग कंबरेपासून खड्ग वेगळे करीत म्हणाला,

" बाईसाहेब, हे असे हाल हाल करून या बचडीचा प्राण कासाविस करण्यापेक्षा मला हुकूम द्या. मी एक घाव आणि तीन तुकडे करून टाकतो या लोण्याच्या गोळ्याचे ! परंतु...."

"त्यांचा छळ कशाला करता? सती जाणार नसेल तर न जाऊ दे ! आपणाला आता असल्या आग्रहांत वेळ खर्ची घालावयास नको आहे. नानांची भेट तिला हवी असेल तर तेही घडून येईल." दादासाहेब म्हणाले.

" तुम्हांला कांहीं समजत नाहीं. तुमच्या राजकारणाच्या दृष्टीनेच मी म्हणते आहे...' आनंदीबाई पुढें बोलू पहात होती परंतु ...परंतु त्यांनी आपले भाषण अर्धवटच ठेविले. कारण त्यांच वेळीं तिचे लक्ष दादासाहेबांच्या डोळ्याकडे गेले.

...ते अगदी लाल झालेले होते. त्या डोळ्यांत खून चढला होता.

मग गंगाबाईला तेथेंच सोडून आनंदीबाई संतापानें आपल्या पायानें भुई झोडीत तेथून दूर झाली.



आनंदीबाई त्यावेळीं सांगत होती ते आपण ऐकावयास हवे होते असे वाटू लागण्यासारखी परिस्थिती आतां दादासाहेबांच्यापुढें वाढून आली.

पुरंदरच्या किल्यांतून बारभाई आपलें राजकारण गंगाबाईचे नांव पुढें करून करूं लागले. तेथे रहाणाऱ्या दिवस गेलेल्या गंगाबाईला नाना स्वतःच्या पापण्यांतले बुबुळ सांभाळावे तसे सांभाळित होते.

आणि पेशवाईच्या सुदैवानें त्यावेळीं तरी सखारामबापू वगैरे मंडळी त्यांना बिनविरोध सामिल झाली होती.

एवढ्या दूर पुरंदरासारख्या ठिकाणींसुद्धां आनंदीबाईने पैशाचे आमिष दाखऊन गडकऱ्याला फितूर करून घेऊन त्याच्याकरवी गंगाबाईवर संकट आणावयाचा प्रयत्न केला. परंतु नानासाहेबांच्या सावधपणानें तो कट परीपक्व व्हावयाच्या आंतच फितूर माणसांना तोफेच्या तोंडावर बांधून उडविण्यांत आले.

या क्रूर शिक्षा देण्याच्या मागील हेतू एवढाच होता कीं पुन्हां तसा प्रकार तेथें होऊं नये.

आणि असें दिवस जात असताना गंगाबाईच्या कानी आलें कीं आपल्या पोटातले पाडस पोटातल्या पोटांत मरावे म्हणून आनंदीबाई राघोबादादाच्या सहाय्यानें कांहीं मांत्रीकांना मदतीला घेऊन काहीं जारण मारणाचे प्रयोग करीत आहे.

या बाबतींतही नानासाहेबांनी गंगाबाईच्या मनावर परिणाम होऊं नये म्हणून समजुतीची तोड काढली.

त्यांनीं पुण्यांतले प्रसिद्ध मंत्रिक माया शंकर गोसावी यांना गडावर बोलाऊन घेतलें आणि त्यांच्याकडून मंत्रजागर करावयास सुरवात केली.

' मुलगा झाला तर मी तुझ्या दाराशी चवदाव्या दिवशीं अनवाणी येईन.' असा नवस गंगाबाई जेजुरीच्या खंडोबाला बोलली होती.

आणि जेजुरीचे जागते दैवत तिच्या नवसाला पावलेहि.



ठरल्याप्रमाणें चवदाव्या दिवशीं सवाई माधवरावाला घेऊन गंगाबाई अनवाणी पायानें डोंगर चढून देवाच्या दाराशीं गेली.

तेथल्या कासवांवर प्रथम तिनें आपले लेकरूं ठेविले.

वेळ रात्रीची आठची होती आकाशातून चंद्र पृथ्वीला दुधाच्या धारानी स्नान घालीत होता. खाली पसरलेल्या पायऱ्यावरील दीपमाला एकाद्या प्रचंड पुस्तकांतील मजकुरा पुढील उद्गार चिन्हासारख्या दिसत होत्या !

नानासाहेब खंडोबाकडे डोळे लाऊन त्या कासवावर ठेवलेल्या बाळराजाकडे बोट करीत देवाला म्हणाले,

" प्रभुजी ! नवस बोलल्याप्रमाणें बाई तुमच्या दाराशीं आली आहे. कांहीं चुकले मुकले तरी सांभाळणार आपणच आहात. तुमचा आधार नसतां तर काहीं नव्हतें. आता आपण पाठीमागे आहात. आतां दुनिया दावा करूं लागली तरीं आम्हीं कल्पांत करूं. या बाळमुठींत तुम्हीं असे बळ भरा कीं पानपतावरली सारी कसर मुद्देमालीने भरून निघावी. बाई असहाय्य आहे. आपल्या छायेत ती उभी आहे, आणि आपला आधार तिला हवा आहे. " नानासाहेब देवाची प्रार्थना करीत होते.

आणि बाहेरच्या आवारांत गंगाबाई कासवाच्या पाठीवरले लेकरू पुन्हा हातात उचलून घेऊन खंडोबाला प्रदक्षिणा घालावयाला गेल्या.

प्रदक्षिणा पुऱ्या करून झाल्यावर त्यांनी पुन्हा परत येऊन देवाचे दर्शन घेतले पुजाऱ्यानें खोबऱ्याची वाटी आणि भंडारा फडक्यांत बांधून दिला. मग नानासाहेबानीं गोरगरिबाना मिठाई वाटली, ब्राह्मण जमा झाले होते त्यांना चांदीची दाक्षिणा दिली

बाळराजाची दृष्ट काढावयासाठीं पुढें आलेल्या मुरळ्यांना गंगाबाईने खण नारळ देऊन गौरविलें.

पुन्हा सासवडकडे पालख्या धाऊं लागल्या तेव्हा चंद्र मध्यावर आला होता. वहिवाटीच्या लोकांनी अपरात्री घाट ओलाडला. सकाळीं पुरंदऱ्याच्या वाड्यात फराळ करून मंडळी सासवडहून गडावर दुपार-पर्यंत गेली.

त्या रात्री गंगाबाईला स्वप्न पडले. खंडोबांनी तिच्या सर्वांगावर हळद उधळली. आणि तिच्या हातात लिंबू खोवलेली कट्यार दिली. आणि सांगितलें कीं या कट्यारीवरले लिंबू कट्यारीवर आहे तो पर्यंत तुझ्या मुलाची फत्ते आहे तो विस्तवावरून चालेल परंतु त्याच्या पायाला फोड येणार नाहींत! तो तुफानात जहाज हाकारील आणि तुफान तोडून परत वापस येईल! तो आगीत पडेल आणि आगेची फुले करून परत येईल! परंतु हे सारे घडेल ते तेथवरच कीं जेथवर या कट्यारी-वरल्या या लिंबाची आणि कट्यारीच्या पात्याची जुदाई झालेली नाहीं. सांभाळ! पोरी सांभाळ! आतां तू आई झाली आहेस सांभाळ हा तुखाणा आणि सांभाळ ही कट्यार. . ''

आणि सकाळीं उठल्यावर पहातात तो उशागती कट्यार पडलेली होती आणि त्या कट्यारीच्या टोकाला लिंबूही खोवलेले होते.

आणि गंगाबाई दुसऱ्या दिवशीं पहातात तो आपले सारे अंग भंडाऱ्याने पिवळे झालेले आहे.

मग त्या अभागी मातेला आपल्या जगण्याची धन्यता वाटली. तिनें ती कट्यार सोवळे नेसून देव्हाऱ्यांत ठेऊन दिली.

आणि पुढे ती रोज त्या कट्यारीची पूजा करूं लागली

◆ ◆ ◆ ◆

काळाचा रथ पुढें आणि पुढें धावत होता. राजांची राज्यें धुळीला मिळाली; मंदिरांच्या माशिदी आणि मशिदींची मंदिरे करीत काळ चालला होता.

एकाद्या दरवेशासारखा पृथ्वीचे अस्वल दावणीला बांधून काळ चालला होता.

विश्वाच्या निर्मात्याला तो खेळ दाखवीत होता, त्या खेळाला रंग भरावा म्हणून तो पाळणे बांधीत होता आणि स्मशानातही वाती पेटवीत होता.

मृगजळांतील पाणी काढून घेत काळ चालला होता. वाळूतील तेल काढीत काळ चालला होता. त्याच्या रथाच्या घोड्यांच्या पायांत दहा धनधवे होते.

त्याच्या हातातले लगाम कलावंताच्या हृदयाच्या तारींचे होते. त्याच्या रथाच्या चाकांच्या धावा गरम लोखंडाला आसवांच्या पाण्यामध्यें थंड करून आकसून तयार करण्यांत आलेल्या होत्या !

बी बियाणाचे रोप करित काळ चालला होता. रोपाचे झुडुप करीत काळ चालला होता. झुडुपाचे झाड करीत काळ चालला होता.

सवाईमाधवरावांनी आता पाळण्यातलें पोरपण सोडले होतें. आता तें दुडुदुडु चालू लागले होते. धाऊ लागले होते.

पुन्हा उन्हाळे आले आणि मेदिनीला तापवित तेले. पुन्हा पावसाळे आले आणि पृथ्वीला थंड करीत गेले.

नानांच्या सावलीत सवाई माधवराव वाढत होतें. गडावरली हवा चांगली होती. बेतशीर अन्न, वक्तशिर वागणें, सालस गुरुजी, यामुळें ते ' मोठे ' होत होते.

' पेशवेपदाचे पदाधिकारी ' म्हणून बाळराजांचा मान सारेच राखीत. परंतु बाळराजे खेळावयाच्या वेळेला गडावरल्या गरीब बाळगोपाळातही मिसळत.

महाभारत आणि रामायण यांचे वाचन आणि मनन नाना-साहेब त्यांच्याकडून करऊन घेत.

नानासाहेब बाळराजांना सांगत,

" तुमच्यावर फार जबाबदारी आहे, श्रीकृष्णासारखा तुमचा जन्म चमत्कारीक परिस्थितींत झाला. आणि तसेच तुम्हांस पराक्रमी झाले पाहिजे. "

आणि पेशवे वाढत होते.

त्यावेळची भोंवतालची परिस्थिती...!

✦ ✦ ✦ ✦

बारभाईनीं गंगाबाईला पाठीमागे घालून आपल्या विरुद्ध पवित्रे टाकलें असे समजताच राघोबाने हैदरअल्लीं विरुद्ध उपसलेली आपली प्रतापी समशेर म्यान केली. त्याच्याशी तह केला. त्याला आपल्या बाजूचे करून घेऊन तो पुण्याकडे येण्यासाठीं वाऱ्याचे वेगानें निघाला

तो पंढरपुरावर आला तेव्हां बारभाईच्या बाजूनें त्याच्या अंगा-वर त्र्यंबकराव चालून गेले. परंतु थोड्याशा झुंजीनंतर त्र्यंबकराव मारले गेले.

या विजयानंतर राघोबांनी आपली 'भरारी' खुद्द पुण्याकडे वळविली. परंतु पुण्याच्या आसमंतात येऊन पोंचताच त्यांना बातमी कळली कीं राजधानींतला बंदोबस्त अत्यंत कडानिकडीचा आहे. तेथें आपल्या घोड-दळाची डाळ शिजावयाची नाहीं.

मग त्यांनीं आपल्या टाली बऱ्हाणपुराकडे वळविल्या. त्याचा पाठलाग करण्यासाठीं पुण्याहून हरिपंत फडक्यानी आपल्या पंचकल्या-णावरती रिकीब चढवून टाच मारली.

दादासाहेबांनीं शिंदे होळकरांशी सूत्र बांधावयाचे पुष्कळ प्रयत्न चालविले होते. ते दोघे कांहीं करतील तर......!

परंतु ते दोघे मातबरही अनेकदा 'डाव पेचांचें' राजकारण करून

चुकलेले होते. तलवार आणि कलम या दोघावरही त्या दोघांचे सारखेच प्रभुत्व होते.

पेशव्यांच्या घरांतल्या दुफळींत प्रत्यक्ष अप्रत्यक्ष आपला फायदा जेवढा करून घेता येणें शक्य होणार होते तेंवढा ते करून घेणार होतें.

पेशव्यांना द्यावयाच्या 'थकबाकी' बद्दलची तगादे करणारी पत्रें त्यांना नानासाहेबाकडून सारखी जात असत.

राघोबादादाच्या या खुळाचा उपयोग तीं 'थकबाकी' कमी करून घेण्यांत करता आला तर ते त्या दोघा सरदारांना हवे होते

आपण प्रत्यक्षपणे कुणाच्याच बाजूचें नाहीं असे दाखवीत नानासाहेबांना आणि राघोबादादांना त्यांनीं चाळवीत ठेविले होते.

परंतु जेथें कांहीं करणे होत नाहीं तेथे माणूस फार दिवस विश्वास टेकून रहात नाहीं दादासाहेबांनीं शिंद्याचा नाद लवकरच सोडून दिला. आणि होळकरांनाही त्यांनीं दुरून नमस्कार केला. इथे राहून कार्यभाग काहींच साधत नाहीं असे पाहून ते मग वेगाने गुजराथेकडे धाऊं लागले.

आनंदीबाईला दिवस गेलें होते. वाटेत लागलेल्या धारच्या किल्ल्यात तिला टेकून ते पुढें मार्ग काढूं लागले.

त्याच्या हालचालीवर हरिपंताचा डोळा तेल घालून उघडा होता. मही नदींतून ते पार होण्याच्या प्रयत्नांत असताना हरिपंताच्या सैन्यानें त्याच्याशी काटघाई केली. सूर्य उगवला आणि पुढें चंद्रही उगवला...

पुन्हां सूर्य उगवला तेव्हा पराजयाने मानखंडना झालेले दादासाहेब इंग्रजाच्या सुरतेच्या वखारींच्या दिशेने जीव घेऊन धाऊं लागले.

आणि पुन्हा अनेकदां सूर्य उगवला. आणि पुढे ज्यांच्या राज्यावर तो कधीच मावळणार नव्हता अशांच्या खाशाशी दादासाहेब तहाची बोलणी करूं लागले.

सुरतेच्या तहांत दादासाहेबांनी लिहून दिलें कीं, " बारभाईंना मोडून मला गादीवर बसविलेंत तर त्यापायीं झालेला फौजफाट्याचा खर्च देऊन साष्टी वसईच्या आसमंतातला एकोणीस लक्षाचा मुलुख मी तुमच्या स्वाधीन करीन." हा तह होताना सवाई माधवराव दहा महिन्याचे होते तात्कालिक खर्चालाही त्यानी इंग्रजांपासून काहीं उचल केली.

आणि व्यापारी वृत्तीच्या इंग्रजानी दादासाहेबांच्या जवळील 'जडजवाहीर' आपल्या तिजोरीत 'सांभाळण्या'साठीं म्हणून टेऊन दिलें.

हा तह होत असताना नानासाहेबानीही आपले हात हलवावयास सुरवात केली. हातातले सारे एक्के दाखवावयाची हीच वेळ आहे असे पाहून त्यानीं ' शिंदे होळकरांना ' थक बाकीत सूट देऊन टाकली आणि त्याच्दावरून कलकत्तेकर इग्रजांच्या कानावर जाऊन आदळेल, अशी ' बाल पेशव्याशीं ' आम्ही स्वामिनिष्ठ आहोत अशी गर्जना करून घेतली. याचा परिणाम ?

◆ ◆ ◆ ◆

वेळ आली ..किंवा वेळ येईल तेंव्हा शिंदे होळकर माझ्या बाजूचे आहेत असे दादासाहेबानी सुरतेला तह करताना सांगितले होते.

ते खरे वाटून कर्नल किटींग फौज घेऊन दादाच्या बरोबरीने गुजराथंकडे निघाला होता.

'शिंदे होळकरानी' आपण सवाईमाधवरावाच्या पक्षाचे आहोत अशी घोषणा करताच कलकत्याहून हुकूम आला कीं...

गव्हर्नर जनरलला तुम्ही करीत असलेले हे दादासाहेबाबरोबरचे राजकारण पसत नाहीं. कंपनी सध्या पैशाच्या अडचणींत आहे. मराठ्यासारख्या मातबर शत्रूशीं आताच लढा उभा करण्यास कंपनी असमर्थ आहे पुढे टाकलेलें पाऊल तुम्हीं मागे घ्या.—"

गव्हर्नर जनरल केवळ हा हुकुम सोडूनच थांबला नाहीं. त्यानें कर्नल अप्टन नावाचा आपला वकील पुरंदरावर नानासाहेबाकडे तह करण्यासाठीं पाठविला.

त्या तहान्वयें केवळ या राघोबादादाने केलेल्या घरभेदीपणामुळें नानासाहेबांना ' साष्टी'वर पाणी सोडावे लागले.

पुरंदरच्या या तहाने इंग्रजानी राघोबाला आश्रय देऊ नये असें ठरले.

बारभाईंचे डोके पुरंदरला आलेला ' अप्टन ' वकील इकडे कुलंडीत होता तेव्हा...



' तोतया ' रत्नागिरीच्या कैदेतून किल्लेदाराला आपल्या बाजूला फितूर करून घेऊन मोठ्या इतमामाने बाहेर पडला.

मी ' इतमाम ' शब्द वापरला हे वाचकानी लक्षांत ठेवावे. एकाद्या चोरासारखी सुखनिधानने आपली सुटका करून घेतली नाहीं. सर्वांना आपण ' भाऊसाहेब ' आहोत असे भासवीत तो किल्याबाहेर पडला आणि अंधारीत बसला.

त्यानें सैन्य जमा केले. त्यानें शिंदे होळकरांना पत्रें लिहिली. त्यानें स्वतंत्र तहही करावयाच्या वाटाघाटी मोठमोठ्या असामींशी आरंभिल्या.

गावामागून गावाला आपण ' भाऊसाहेबच ' आहोत याची ' खात्री ' पटवित तो तोतया मार्ग आक्रमित होता.

"आपण पुण्यास येणार आहोत 'पंचारती' घेऊन मला ओवाळण्यासाठीं तयारींत ऐस." असा निरोप त्याने पार्वतीबाईना पाठविला होता.

पार्वतीबाईंनीं अजून आपल्या कपाळावरचा मळवट पुसला नव्हता. आपला पति जिवंत आहे असें तिला वाटत होते.

आणि 'सुखनिधान' हा तोतया आहे अशी अजून तिची पुरती खात्री पटली नव्हती.

आणि पार्वतीबाईच्या जागीं कुठलीही दुसरी स्त्री असती तरी मलमलीवरल्या या मखमली भासामध्यें स्वतःचा दुःखी जीव काहीं वेळ गुंतवून टाकावयाचा चाळा ती करती.

एकाद्या प्रिय व्यक्तीच्या मरणाच्या बातमीत जर संदेह असेल तर त्या संदेहाचा अर्थ ती व्यक्ती जिवंत आहे असाच लावावयाची धडपड ऋणानुबंधियांकडून होत असते.

आणि बाळराजे वाढत होते !

आणि कस्यारीवरले लिंबू कस्यारीवर होतें.

—०—

—६—

# पटावरील सोंगटी पटावर

" शिंद्याना लिहा कीं पेशव्याना तुम्हाशी कांहीं महत्वाचे खलबत करावयाचे आहे. कामकाज निकडीचे आहे. जेवावयास बसला असाल तिकडे तर आचवयास इकडे या " नानासाहेब आपल्या सरकारकुनाला सांगत होते.

जेवढें बुद्धिबळाने निस्तरता येतें तेवढें अरिष्ट त्यांनीं निवारलेले होते. आता या तात्याचे बळ वाढले आहे असे पहाताच...

कोणाचे प्रतापशाली खड्ग पेशवाईला धोक्यांत घालू लागले की शिंद्याच्या अब्दागिऱ्या दाक्षिणेच्या बाजूला पालऊ लागत.

आणि शिंद्यांची कवाईती फौज येते आहे अशी आवई उठली कीं शत्रूचे बळ निम्मे अधिक कमी होई.

त्या काळांत पाटीलबोवाचा दरारा हा असा होता. ते तिकडे उत्तरेत गुंतलेले असत तोवर हैदर गडबड करी, निझाम तोंड सोडून बोले.

परंतु ते उत्तरेतून दक्षिणेकडे येत आहेत असे समजलें कीं हे सारे अल्लल डुर्रर करणारे—अल्लाचे प्यारे असामी मैफलीतील अस्ताई गावयास आरंभ करीत.

तातया, पटवर्धनांना आणि फडक्याना आटोपण्याच्या पलिकडे होता. आणि आता तर तो मुंबईकर फिरंग्याच्या आश्रयाची आशा धरून समुद्रांत उतरावयाच्या बेतात होता.

धुलुपांचें आणि आंग्र्यांचे आरमार त्याला जमिनीवरून हकलूं शकत नव्हते. आणि हुशार तोतया तें असें जमिनीवर गुंतलेले असतांना तो आपल्या नशिबाचे जहाज दरियात लोटणार होता.

भाऊसाहेबांचा हा तोतया एक खुळ लागलेला शहाणा होता. त्याच्या व्यक्तित्वाचे नीट निरिक्षण केले म्हणजे आज आपणाला वेड्यांच्या इस्पितळात तशा तऱ्हेची कांहीं माणसे असलेली दृष्टीस पडतात.

अशी माणसे आरंभी अत्यंत बुद्धिमान असतात. योग्य संधी मिळाली असती तर, तर, जगातील थोर पुरुषांच्या यादीत त्याचे नाव नोंदले जाण्याची शक्यता असते.

...परंतु त्याच्या दुर्दैवाने अशी संधी त्याना मिळत नाही. मग...मग...मग...

...मग 'जे' होण्याचे त्यांची अपेक्षा असते त्याची आरंभीं ते नक्कल करूं लागतात.

सामान्यतः हे असें होते. परंतु एकाद्याचे ' तोतये ' पण पत्करण्याची खरीच संधी चालून आली तर अशी माणसे 'प्रत्यक्षपणें'च त्या व्यक्तीचे ' भूत ' होतात. आणि असें दुसऱ्याचें ' व्यक्तित्व ' त्यांनी एकदां पत्करलें म्हणजे जवळ असलेली अमोघ बुद्धिमत्ता ते मोठ्या हिरीरीनें आणि चातुर्यानें आपल्या व्यक्तित्वाचे ' नकली ' नाणे जगाच्या ब ज [illegible] [illegible]याच्या प्रयत्ना [illegible]

सुखनिधान हा असा होता !

नानासाहेबांची खात्री होती कीं तो तोतया आहे आणि म्हणूनच......!



तोतयाला पाटिलबावांनी गिरफदार केले. आणि पटवर्धनांच्या स्वाधीन केले. आरंभीं त्याला मिरजेच्या किल्यांत ठेवण्यांत आले.

नंतर पुण्यांत सावताबाई जेव्हां उघड उघड नानांशीं हुज्जत घालूं लागली तेव्हां नानांनीं नाइलाजानें त्याला पुण्यांत आणलें.

मग नानांनी चौकशी केली. आणि त्या उघड चौकशींत असें सिद्ध झालें कीं तो ' तोतया ' आहे.

मग फरासखान्याच्या हौदावर फळ्या टाकून चौथरा बनविला गेला. आणि तोतयाला मृत्युदंड देण्यांत आला.

अगदी जीभ बाहेर पडावयाच्या वेळेला देखील आपण भाऊ-साहेबच आहोंत अशी बोंब त्यानें मारली.

त्याला मूठमाती देऊन नाना मोकळे झाले आणि पुन्हां आवती भोंवतीं पाहूं लागतात तो.

◆ ◆ ◆ ◆

हैदरवर चालून गेलेल्या हरिपंत फडक्यांच्या आणि पटवर्धनांच्या फौजेत फितुरीच्या वेलीवरील पराजयाची फुलें उमलूं लागलीं होतीं.

आणि फितुर करून घ्यावयाला योग्य अशीच त्या वेळेला त्या सैन्यांतील शिपायांची परिस्थिती होती. कधीं कांदा, कधीं भाकर आणि कधीं तेंही नाहीं असें ते सैन्य अनेक उन्हाळे आणि अनेक पाव-साळे लढे लढत होतें; आणि आता धोंड्यांत निजणाऱ्या आणि कोंड्यांत जेवणाऱ्या त्या शिपायांच्या अंगावर धड वस्त्र नव्हतें; धड शस्त्र नव्हतें. शिलेदारांच्या पगड्यांवरील 'जरी' काळ्या पडल्या; खुद्द सेना-पतींचे डेरे कोल्हाट्यांच्या राहुट्यांच्या अवकळेला येऊन पोंचले!

मुशाहिऱ्याचें दर्शन नाहीं, आणि चोविस तास डोळे उघडे ठेवावयास भाग पाडणारा हैदरासारखा हिकमती शत्रू...

"पैसे पाठवा! रकमा पाठवा" असे निरोप पुण्याला पाठवून पाठवून फडके, पटवर्धन अगदीं जेरीस आले होते.

केवळ ' इमाना ' साठीं आजवर ते शिपाई लढत आले होते. परंतु उपाशी पोटाच्या वरल्या छाताडांतून सिंहाच्या गर्जना

बाहेर पडत नाहींत. म्हणतात हवा नसल्यासारखी त्या दोघा सरदारांची गत झाली होती.

डोळे पुण्याकडे आणि तलवार हैदरकडे ठेवीत लढणाऱ्या त्या दोघा सरदारांना अखेर पुण्याहून एकदाचा निरोप आला.

निरोप आला कीं असेल त्या परिस्थितीत पुण्यास या....

✦ ✦ ✦ ✦

थोडीशी वाताहात झालेले ते सैन्य अर्धा लढा टाकून पुण्याकडे परत फिरले. आणि याच वेळीं कोल्हापूरकरांचे भाले पटवर्धनांच्या मुलखावरले आभाळ हलक्या हातानें उसऊं लागले.

मग महादजी शिंदे नानासाहेबांच्या सांगण्यावरून वानवडीहून कोल्हापूरकरांच्या अंगावर जाण्यासाठीं हलले.

...परंतु त्यांचा मुक्काम पुण्यापासून दहा मैलावर गेला नाहीं तोंच त्यांच्या धाकानें कोल्हापूरकरांनीं पटवर्धनांच्या मुलखातून केलेले नुकसान भरून देऊन आपला पाय काढला.

मग महादजीनी बाहेर पडल्यासरशी पंढरपूर जेजुरीची यात्रा केली आणि ते परत पुण्यास आले.

✦ ✦ ✦ ✦

या साऱ्यांतून नाना मोकळे होतात तोंच पुन्हा एक अस्तनी-तला निखारा त्यांचे भुजदंड भाजूं लागला.

सखारामबापूंनीं येथपावेतो नानासाहेबांशीं हातात हात घालून सहकार्यानें कामे केली. परंतु मनापासून ही दोन्हीं थोर मंडळी एक-मेकाना पाण्यात पहात होती.

सवाई माधवरावाशी एकनिष्ठ राहूनही जेथें नानासाहेबांशी वैर करता येणें शक्य होतें तेथें तें करावयाची बापूंची तयारी होती.

सखारामपंताची बुद्धिमत्ता नानासाहेबांच्याच तोडीची होती. शिवाय त्यांनीं काहीं उन्हाळे पावसाळे त्याच्यापेक्षां अधिक पाहिलेले होते.

हे सारे होते परंतु मध्यंतरी दादासाहेबाच्या बाजूला त्यांच्या मनाचा कल झुकला गेल्यामुळें पेशव्याच्या घरच्या मंडळींचा त्याच्यावरला विश्वास नानासाहेबाच्या एवढा नव्हता.

आज उघड उघड अशी परिस्थिती होती कीं पेशवे नानासाहेबाना वडीलकीचा मान देऊन वागत होते.

आणि नानासाहेबाना हा घरींदारीं मिळणारा मान पाहून गारदी मनांतल्या मनांत रागाऊन जात. असें मनातल्या मनात संतापून जात असताना फार दिवस निष्क्रीय रहाणे त्यांना शक्य नव्हते.

मग फिरून एकदा त्यानीं कांहीं हालचाली करावयाच्या ठरविल्या. स्वतः नामानिराळे राहून जें काहीं डाव खेळता येतील तेवढेंच ते खेळूं लागलें.

या वेळेला त्याच्या हातातला त्यांचे डाव खेळावयासाठीं मोराबादादाच्या स्वरूपात एक उघड मित्र मिळाला.

या नानाच्या चुलत भावाला हाताशीं धरून ते नानासाहेबाच्या विरुद्ध एक षडयंत्र करूं लागले.

नानाच्या नजरेतून अर्थातच नेहमींप्रमाणे हीहि गोष्ट निसटली नाहीं. कट चागला शिजून येईतो ते कांहींच बोलले नाहींत.

कट करणाऱ्याना असें वाटूं लागलें कीं आता आपले फासे सवाई माधवरावाच्या कंठाभोवतीं आणि पर्यायानें नानासाहेबांच्या भोवतीं पुरतेरणानें पडलेलें आहेत. आता गाठ मारावयाचाच काय तो अवकाश कीं दादासाहेबाची फत्ते....

...की नानासाहेबाचे डोके हत्तीच्या पायाखालींच... कीं सखारामबापू मुख्य कारभारी...

...आणि ते उजवा हात तर आपण डावे हात पेशव्यांचे ! आणि मग...

नाव ! पैसा ! नाच आणि रंग.

आपले नांव नानासाहेबांसारखे व्हावे असे मोरोबादादांना फार फार वाटे. आणि या एकाच महत्वाकांक्षेच्या आहारी जाऊन त्यांना दादासाहेबाशी पत्रव्यवहार ठेविला.

लेखी पुरावा हवा तेवढा सांपडेल असा विश्वास वाटताच नानासाहेबांनी पटवर्धन फडक्यांना पुरंदरपाशीं जमा व्हावयास सांगितले

आणि असे 'भुजबळ' वाढऊन ठेविल्यानंतर त्यानीं मोराबा-दादाला गिरफदार करून नगरच्या किल्याकडे रवाना केले.

सखारामबापूंच्या वाटेस या वेळीं नाना गेलें नाहींत. तें का गेले नाहींत यांचे कारण असें होतें कीं बापूंचे नांव प्रत्यक्षपणें चिठी-चपाटींत कुठेच गुंतलेलें त्यांना आढळून आले नाहीं.

पुरंदरच्या तहाने इंग्रज 'आपला' झाला अशी समजूत करून नानासाहेब आपल्या अफाट राज्यविस्तारातील अंतस्थ वसुलीकडे लक्ष द्यावयास लागले होतें तोंच......

✦ ✦ ✦ ✦

कलकत्त्याहून त्यांच्या बातमीदाराचे त्याना पत्र आले कीं,

'दादासाहेबाच्या नादी आता कलकत्त्याचे गव्हर्नर जनरलही लागले आहेत. पुरंदरच्या तहाच्या कागदावरील शाई पुरती वाळते न वाळते तोच त्याचा बोळा करून केराच्या टोपलीत टाकून द्यावयाची येथें तयारी सुरूं आहे. पुण्यातल्या 'बारा' तले 'स' कारावेल्हे आणि 'मो'क्ष पदाची इच्छा धरणारे 'चंचला' रुधिरासक्तास अनु-कुल झालेले आहेत. फिरंगी सुरतेच्या तहाला पुन्हां डोक्यावर घेऊन मुंबईत उतरतील. तरी सावध....

आणि मग नानासाहेबानी या परद्विपस्थांच्या राजकारणाला अधिक रंग भरावयासाठीं पुण्याच्या दरबारात एका दुसऱ्या परद्वि-पस्थाला आणून मानमरातबाने गौरविण्यांस आरंभ केला.

'सेंट ल्युबिन' या फ्रेंचाचे प्रस्थ नानासाहेबांनी पुणें दरबारांत येवढें वाढाविलें कीं,

..पुण्याच्या इंग्रज वकीलानें आपल्या पत्रांतून कलकत्त्याकडे वारंवार त्याबद्दलची बातमी महत्व देऊन पाठविली.

नानासाहेबाचे आणि सेंट ल्युबिनचे प्रत्यक्ष असें बोलणें औपचारिक स्वरूपाचेंच होत होते.

...परंतु पुण्याच्या इंग्रज वकिलाचे पित्त इतके भडकले कीं त्यानें एक दिवस नानासाहेबाची मुद्दाम गांठ घेऊन सांगितले कीं...

" तुमचा आमचा पुरंदरला तह झाला. आपण तुपण जान मध्यें जान मिसळलेलें दोस्त झालो. असें असता आमचा दुष्मन असलेला हा फ्रेंच माणूस पुन्हां गौरवाने सांभाळता याचा अर्थ काय ?..."

...या त्याच्या कपाळावर आठ्या घालून केलेल्या बोलण्यावर नानासाहेब सस्मित उतरले,

" हे पहा, हे तुमचे दुष्मन आहेत हे कबूल. परंतु प्रत्यक्षपणें त्याचे तुमचे आज युद्ध कुठे चालू आहे ? तसें असते तर गोष्ट वेगळी होती. मग आम्हीं या माणसाला पुण्यात पाऊलही टाकून दिले नसते. परंतु आता कांहीं त्याचे तुमचे जंग प्रत्यक्ष चालू नाहीं. आतां तुम्ही म्हणता तसें आम्ही त्याला इतमानाने वागवतो; परंतु, परंतु त्याचे कारण असें कीं साऱ्या परद्विपस्थाना आम्ही आमचे मेहमान समजतो. महिना पंधरा दिवस ते रहाणार, अगदी दोन महिनें म्हणजे शिकस्त, डोक्यावरून पाणी गेले. मग निरोप, अत्तरगुलाब. आणि या दोन महिन्यात दिवस रात्र जर गाठी भेटी झाल्या त्याच्या आमच्या तरी त्यांत बातचीत इकडच्या नाचरंगाची तिकडल्या गाणे बजावण्याची...नर काय? थोडी मैफल, थोडी शिकार ' थोडे देणे घेणें'...आणि मग त्यांचा आमचा निरोप....तुमचे आमचे लोभ बंधुभावाचे. हे किती झालें तरी दहा हात दूरचे..."

नानासाहेबांनी हंसत हंसत दिलेल्या या उत्तरानें त्या इंग्रज वकिलाचे कांहीं समाधान झालें नाहीं.

कारण त्याच्या हेराने त्याला त्या दिवशींच रात्री बातमी आणून दिली कीं अगदी नवीन घर्तीच्या तोफा ओतण्याचे काम खडकावरल्या भट्टीखान्यात पुण्यात सुरूं झाले आहे. आणि चार निष्णात फ्रेंच इंजीनिअर या कामावर देखरेख करीत आहेत.

नानासाहेबांच्या हेरानें दुसरे दिवशीं नानासाहेबाना येऊन बातमी दिली कीं,

" कलकत्त्याहून हुकूम निघाला आहे कीं मुंबईतल्या फिरंग्यानें कल्याणला पोंचून घाट उतरावयास लागावे.

ही बातमी ऐकून घेऊन नानासाहेब हंसले, आणि स्वगत पुटपुटले.

" कांहीं हरकत नाहीं ! फिरंग्याना आमचा हिसका कसा असतो हे पहावयास हवें असेल तर आमच्याहीं अंगरख्याच्या अस्तन्या आम्हीं वर सारलेल्या आहेत. "



आणि मुंबईहून पुण्यावर चालून येणाऱ्या फिरंग्यांना नानासाहेबांनी खूप खूप पुढें येऊन दिले. आणि मग वारुळातून पुरतेपणी-बाहेर येऊन दिलेल्या सापाची शेपटी उडवावी तशी घाट उतरून पुढें आलेल्या फिरंगी फौजेची नानासाहेबानी रसद मारून टाकली. आणि पोट ढिले झालेल्या या सैन्याला त्यांनी वडगावावर तोंड दिले.

आणि मग...

कर्नल इगर्टनच्या फौजेला सर्व 'मराठा सरदारमंडळा'नें एकीने आणि नेकीनें तोंड दिले.

कॅप्टन स्टुअर्ट मारला गेला...

आणि कार्ल्याला कोंडीत धरलेल्या फिरंग्याला वडगावाजवळ

पराभव पत्करुन आपल्या ढाली संभाळीत आणि तलवारी टाकीत टाकीत मागें फिरावे लागले.

आणि दादासाहेब ...!

त्याना शिंद्यांच्या स्वाधीन व्हावे लागले. पुन्हा पटावरुन उडालेली सोंगटी पटावर आणून ठेवण्यात आली.

...आणि येवढें झाल्यावर मग नानासाहेब एकदा आपल्या मनातल्या मनात पुन्हा एकदा हंसले.

---

—७—

# तुणतुण्याच्या तारेवरलें बोट

" गोपाळ "

गंगाबाईने पाठविलेली जासूदजोडी सासवडातल्या गोपाळ शाहीराच्या दाराशीं येऊन त्याला हाकारत होती.

मग गोपाळा बाहेर आला.

" आपल्याला बाईनीं गडावर बोलाविले आहे. "

" येतो " गोपाळाने उत्तर दिले.

" साथीचे सामान पण बरोबर घ्या ! " निरोप्यानें सांगितले.

" होय..." गोपाळानें उत्तर दिले.

" आज राजांचा वाढदिवस आहे. "

" आलं लक्षात. " गोपाळा म्हणाला.

" कांहीं नवीन पवाडा ऐकवा आज. "

" होय ! ऐकवीन " गोपाळा म्हणाला

मग जासूदजोडी निघून गेली.

मग गोपाळा तुणतुण्याची तार ताणूं लागला. गडावर तो सर्वांचा आवडता शाहीर होता.

गंगाबाईला म्हणता यावी म्हणून गोपाळानें देवाधर्मावर कितीतरी गोड गाणी रचून दिली होती.

श्रीमंत सवाई माधवरावावर ही त्यांनी काहीं गाणीं करून बाईसाहेबांना दिली होती.

त्यांतले एक गाणें......असें होते.

खडी साखरेचा खडा
माझा चिमणा बाई चिमूखडा ॥ ध्रु ॥
या हृदयाचा हेलकावा
मायेचा ममतेचा मावा
पुण्याईचा पावा रंसरंगाचा रावा
पान्हे पीता पंख फडफडवीतो फडाफडा ॥ १ ॥
रांगतो ग दुडदुडा
डोलतो काढुन फडा
पद्रासंगे घेतो झडा
इवल्या हातांनीं गळ्या भवताला घाली वेढा ॥ २ ॥
हा माझा गुलाबी गुलाल
संसाराच्या अंधारी ही मशाल
राहो खुशाल...राहो खुशाल
हा कुंची अंगड्यातला छकडा ॥ ३ ॥

हे गाणें गंगाबाईचे आवडते होते. आपल्या बाळराजांना ती हेंच गाणें म्हणून झोपवीत असे.

आतां 'राजे' बाळ राहिले नव्हते तरी आईच्या अधरावले तें गाणें अजून जसेंच्या तसेंच होते.

नानासाहेबाचेही गोपाळ शाहीरावर प्रेम होते. महाराष्ट्रात त्याचा फार बोलबाला नव्हता. त्याचें जीवन सामान्य, सज्जन माणसासारखे होते.

इतर शाहीराप्रमाणें आपल्या बायकांना वनवासी करीत मुरळ्यांचा तांडा जवळ बाळगून माडींवरती बसले, मांडीवर मान

ठेऊन रुसले, हंसता हंसता रडले, रडता रडता हंसले, फसले ग बाई फसले ' असली गाणी ( ! ) किंवा लावणी गात गावामागून गांवे तुडवत तो जात नव्हता.

आपल्या गावांतल्या गोरगरिबाच्यावर तो कवने करी, आणि विनामोबदल्यानें तीं उरूसामध्यें म्हणून दाखवी.

राजाला प्रजेचा त्राता समजूनच तो त्यांवर कविता करीत होता. आपल्या शाहीराच्या पेशाला ' चारित्र्या ' ची जोड हवी म्हणून तो सारा वेळ ईश्वरोपासनेंत घालवी.

लग्न त्याने आतापर्यंत केलें नव्हते आणि पुढें तें करण्याचा त्याचा विचार नव्हता.

लग्न का करीत नाहींस असे कुणी विचारले तर तो सांगे,

" शाहीराला लग्न कशाला हवें. !

जो जगाचा भाट आहे त्याने बाईलीची खाट मांडावयाचा घाट कशापायीं घालायचा ! विश्वदात्या साऱ्या स्त्रियांना ज्याला आया बहिणी मानावयाचे आहे त्यानें एकाच बाईलीकडे वेगळेपणानें पहाणें कसें शक्य आहे. आणि हे सारे सोडून दिले तरी जातिवंत शाहीराला शूर मर्दांचे पवाडे गाऊन जिथे स्वतःचे पोट भरता येत नाहीं तिथें जन्माला घातलेल्या चिल्ला पिलाना त्यानें काय बोरी भोकरी भरवाव्या! आजचे सावशिलेदार, राव सरदार लावणीवर आणि लवंडीवर रक्कम खुर्दी करावयास तयार आहेत ! परंतु...परंतु...परंतु फत्तरांना पेटविणाऱ्या शिपायप्याद्यांची धमनी धमनी तापविणाऱ्या, दुष्मनाच्या सिंहासनाला चळचळा कापविणाऱ्या त्या पवाडे लिहिणाऱ्या कलमाची किम्मत फुटक्या कवडीचीहि इथे नाहीं इथे आज मोल आहे तोल गेलेल्या मस्तवाल, मिजाशी, मतवाल्या छचोर अंबू गंगूचे ! इथे आज रसिकता नागझरींतून नौकाविहाराला निघालेली आहे. भागिरथीचे पाणी इथे आज चूळ भरावयासाठीं उपयोगात आणले जाते. हे

आज असें आहे आणि उद्याही असेंच होत रहाणार! हीन अभिरुचींचा ऱ्हास असाच वाढता रहाणारा असतो. आज ज्यांचे कवित्व गौरविले जातें त्यांचेच उद्याही गौरविले जाईल. त्या छिनाल-वर्तनाच्या, छिनाल शाहीराच्या बेताल कवित्वाची आजच्याप्रमाणें उद्याही आरती होईल. परंतु परवा...! कधींतरी कालचक्रातून यांची स्मृती हकालपट्टी होऊन दूर जाईल आणि मग आमच्या सारख्यांच्या हक्काच्या कायमच्या जागा आम्हाला मिळतील. कालपुरुषाचा कंठ असलेले आम्ही जातिवंत शाहीर, जन्माजन्मांचा विचार करीत नाहीं. प्रत्येक जन्म आम्ही मृत्युकडे गहाण टाकतो. एका ध्येयासाठीं आम्ही जगतो. एका धर्मासाठीं आम्ही उरतो. आम्ही स्वतःला भगवंताची मुरली समजतो. राम आलेले आम्ही पहातो. श्रीकृष्ण गेलेले आम्ही पहातो. धुवून कपडे स्वच्छ करावे तसे मरण आमचे जुने देह धुऊन टाकतो. मुक्ति आजही आम्हांला मिळू शकेल. जातिवंत शाहीर पृथ्वीच्या प्रगतीसाठीं हातात कलम घेतो आणि ती प्रगती ' असीम ' असल्या-मुळें जातिवंत कवीची परंपरा कधीच खंडीत होत नाहीं. अशा शाही-राना नाव नको असते. अशा शाहीरांना गाव नको असते. अशा कवींना कुणाचे दास व्हावेसे वाटत नाहीं. अशा कवींना कुणाचे 'हांसू' झालेले आवडत नाहीं. धबधब्याच्या धारेप्रमाणें गणमात्राच्या बेड्या तोडून, फोडून टाकीत अशा कवींची प्रतिभा वायुलहरीच्या स्कंधावर बसून दहा दिग्गजाना भेट देऊन परत आपल्या प्रस्थानीं येते. अशा कवींनी लिहिलेल्या कवितेतील प्रत्येक कानामात्रा अंधजनांची काठी होते. अशा कवींच्या कवितेंतील प्रत्येक अनुस्वार आजच्या आणि उद्याच्या सीतासावित्रींचे कुंकू बनते. ''

गोपाळाचे हें असले बोलणें नानासाहेबांना फार आवडे. सव-डींत सवड काढून ते त्याच्याशीं तासन् तास बोलत बसत.

इतर शाहीरासारखा मान लवऊन गोपाळाने मुजरा कधीच कुणाला केला नाहीं. आणि बिदागीची अपेक्षा न करणाऱ्या त्या

स्वतंत्र रहाणाऱ्या शाहीराने आपल्यापुढें मान वाकवावी असेही कुणाला वाटलें नाहीं.



गडावरला वाढदिवसाचा सोहळा संपल्यानंतर आपले डफ तुणतुणे बंद करून ठेऊन डोंगर उतरावयाच्या तयारीत तो होता.

येवढ्यात नानासाहेबांच्या निसबतींतला एक नोकर त्याला बोलवावयाला आला.

.. आल्याबरोबर नानासाहेबांनीं त्याला आपल्या खलबतखान्याच्या अगदी एकीकडल्या एकाताच्या जागेत नेले.

'शाहीर!' नानासाहेबांनी आपले टपोरे तेजस्वी डोळे त्याच्या-वरून कौतुकाने ओवाळीत त्याच्या पाठीवर प्रेमाचा हात ठेवित म्हटले.

गोपाळानें आपले बालसुलभ निरागस डोळे त्याच्याकडे वळविले तो काहीं बोलला नाहीं; परंतु त्याचे डोळे खूप खूप बोलले.

मग नानासाहेबानी त्याला आपल्या जवळ बैठकीवर बसऊन घेतले

"एका महत्वाच्या कामगिरीसाठीं मी तुम्हाला आतां बोलाऊन घेतले." ते म्हणाले.

शाहीर नुसता हंसला !

"जे माझ्या मनात आज खूप दिवस होते ते जमणे माझ्या हयातींत शक्य नव्हते. माझ्या मनातून तुझ्या सारखेच कलम बहादूर व्हावयाचे होते. विश्वाचे कवि मला व्हावयाचे होते. परंतु दैवाने भलतें प्राक्तन माझ्या ललाटी लिहिलें आणि आज मी असा राजकारणांत गुरफटून गेलों. दहा दिशाना सांभाळावे अशा मगदुराच्या या फडणविसाच्या हाताना आतां म्हैसूर आणि दिल्लीदरबारापासून शिव छत्रपतींने संस्थापिलेल्या गादीचे संरक्षण करावयाचे काम करावयाचे आले. हे सारे मी करीत आलों आणि मरेतोपर्यंत आता करीतच रहाणार. परंतु..."

नानासाहेब बोलता बोलता मधेंच थांबले. त्यांच्या पापण्यांत आता आसवांच्या गोल बुंदाच्या परिघात दुःख वर्तुळाकृती फेऱ्या मारीत होते

त्यांनी आपल्या पापण्या झप्दिशी मिटल्या आणि आसवें पुन्हा आतल्या आंत लोटून टाकली.

आतापर्यंत, त्या घटकेपर्यंत नानासाहेबांच्या डोळ्यांना प्रकटपणें पाणी कधी आले नव्हते. आणि आतांही ते आलें नाहीं.

तसें पाहिलें तर डोळ्याना रासन्हाणी घालावयाचे प्रसंग आतां· पर्यंत किती तरी वेळा त्यांच्या आयुष्यांत आले.

असे हृदयाच्या तारांना कमालीच्या किमान मर्यादेपर्यंत ताण देणारे प्रसंग या बुद्धिसागराच्या आयुष्यांत....

ना एक आले.

ना दोन आले.

ना तीन आले, ना चार आले, ना पाच आले, ना सहा आले, ना एकवीस आले.

पानपतावर लाख राजवर्खे वाढवले त्यात त्यांची आईही होत्यांची नव्हती झाली.

"ती जिवंत असली तर आणि शुद्ध असली तर हवा तो खर्च करून आकाश पाताळ एक करून तिला माझ्याकडे पाठवा आणि ती शुद्ध नसली तर तिला गंगेत बुडऊन टाका" असा मजकूर बुंदेले, शिंदे, होळकराना लिहितानांही ते प्रकट रडले नाहींत.

गडावर बाळराजे वाढत असतांना स्वतःला कधी न झालेला मुलगा दहा दिवसाचे बाळपण आपल्या आईच्या पदराआड काढीत देवाघरी गेला तेव्हाही नानासाहेबाचे गाल आसवाच्या गुळवणीनें पुजिले गेलें नाहींत.

ज्याला जिवाभावाचा आणि रक्ताच्या लाग्याबांध्याचा भाऊ मानला आणि जो चुलतभाऊ होता त्याने विषप्रयोगानें त्याना मारा-

वधाचे प्रयत्न केलेले कळून आले तेव्हांही त्यांनी क्रोधाश्रु सांडले नाहींत.

पर्वतीवर नानासाहेब पेशव्यानें भाऊ भाऊ करीत प्राण डोळ्यातून बाहेर टाकलेले ऐकूनही त्यांनी पाण्याचा ओलेपणा गालाना कळू दिला नाहीं.

तोतयावर विश्वास बसून बहीण मानलेल्या पार्वतीबाईने त्याना नाहीं नाहीं ते बोलून घेतले तरी त्याचे चित्त ' प्रयाग'च्या संगमांत स्नान करून आले नाहीं.

श्रीमंत माधवराव, तापाच्या उष्णतेनें अंगाची लाही लाही झाल्यामुळें अंगाभोंवती लपटलेली केळीची कोवळी पाने ' निखारे निखारे ' म्हणून भराभर उपसून फेकून पायापसल्या इमानी तुळाजीला हाणू मारू लागला आणि साध्वी रमाबाईला तूं ' नक्की सती जाईन ' अशी शपथ घे असें पुन्हा पुन्हा फर्माऊन त्या केवळ गोमूत्र पिऊन आसन्न मरण पतीच्या उशापायथ्याशीं रात्रंदिवस बसणाऱ्या त्या सावित्रीचा अंत पाहू लागला, तेव्हांही ते रडले नाहींत.

आणि वचन पतीने घेतले म्हणूनच नव्हे तर खऱ्याच पतीप्रेमाने जेव्हा थेऊरला नदीकाठीं हत्तीपासून गाय घोड्यापर्यंत आणि रुप्या माणकांच्या दागिन्यापासून ते ताब्या पितळेच्या भांड्यापर्यंत दान धर्म करून शिवमंदिराच्या गाभाऱ्यांतील गांभिर्य मुखावर झळकवीत नववधूने शेलासाडीला गांठ दिलेल्या अवस्थेत हासू डोळ्यांत आणि गालात, आनंद हृदयात आणि अंगोपागात खेळवीत पुष्पशय्येवर विराजित व्हावे तसे लाख जिव्हाने दिगंबराची आर्द्रता निपटू पहाणाऱ्या आणि नदीकिनाऱ्याचा चिखल नदीतल्या भाजून काढलेल्या विटाप्रमाणें टणक बनविणाऱ्या चंदनाच्या प्रचंड चितेत तिने हलकेच प्रवेश केला, तेव्हां नारायणाला पोटाशी धरून ठेवणारे प्रेक्षकांतले नाना ही

वास्तविक कळवळून रडावयास हवे होते; परंतु त्यावेळीही ते उघड रडले नाहींत.

सुमेरसिंगानें साडे तीन हाताच्या नारायणाला उसाच्या कांड्या सारखें हातापायाचे काप काढीत कापलेले कळल्यानंतरही ते उघड रडले नाहींत.

एका मागून एक त्यानी असे हे प्रसंग पाहिले ..

आणि तरीही ते रडलें नाहींत.

आणि आतांही ते रडलें नाहींत, परंतु या घटकेला आसू सांडावयाच्या किमान मर्यादेपर्यंत त्याचे दुःख येऊन किल्याच्या दरवाजांना धडक देणाऱ्या गजेंद्राच्या अवसानांत उभें होतें येवढें मात्र खरे.

आणि शाहीराच्या चाणाक्ष डोळ्यासमोर घडलेली ही गोष्ट त्याच्यापासून अर्थातच लपून राहू शकली नाहीं.

मग कांहींवेळ शांततेत गेला. बर्फाच्या भांड्याला तुरटीने कल्हई करावी तशी ती शांतता त्या दोघानाहीं चमत्कारीक वाटली.

मग काहीं वेळ गेल्यानंतर शाहीरानेंच तोंड उघडले.

" आपण मला काहीं महत्वाची कामगिरी सांगणार होतात ?"

" होय ! " नानासाहेब म्हणाले.

नंतर काहीं वेळानें ते पुन्हां बोलतं झालें.

" श्रीमंतांच्याकडे तू वारंवार यावेस, त्यांना तुझा सहवास घडावा असे मला वाटते. तुझ्या सहवासात त्यांच्या पुढच्या जीवन-क्रमाला अत्यावश्यक असलेल्या अनेक सद्‌गुणाची ओळख त्यांना होईल. "

एवढे बोलून नानासाहेब शाहीराकडे पाहूं लागले.

बराच वेळ ते असेच पहात राहिले; चार डोळ्याच्या वर्तुळांत कांहीं विचाराचे हय दौडत होते.

" मग काय ? " नानासाहेबांनी विचारले.

" विचार करून उत्तर देतो ! " शाहीर म्हणाला.

" आणि हे कार्य तूं केलेस तर सरकारांतून याच पेठ्यातले एकादे गांव इनाम द्यावयाची व्यवस्था मी करीन." नानासाहेब म्हणाले.

हें ऐकूनही शाहीर निमूटच राहिला. त्याच्या निमूट रहाण्यातला अर्थ नानासाहेबाच्या लक्षात आला मग त्यानी पुन्हा शाहीराच्या पाठीवर हात टेवला.

" हे पहा कांहीं मोल करावे तुझ्या अमोल सेवेचें म्हणून मी हे बोललो नाहीं. परंतु माझी इच्छा काय येवढे कळावे म्हणून मी गांवाच्या इनामाची गोष्ट काढली " नानासाहेब म्हणाले

" दोन घासाचे कादा भाकरीचे हे माझे पोट, त्याला गाव कशाला इनाम हवा ? आणि अन्न नाहीं वस्त्र नाहि अशी हजारो माणसे मी या परिसरात पहातो. पुण्याला मधे आलो तेव्हां दोन दोन ठिकाणची श्राद्धाची जेवणें दक्षणेच्या आशेने जेवलेले ब्राम्हण आम्हाला शिव्या देत जाताना पाहीले आणि त्याच्याच वाटेत अडगळा सारखी त्यांना वाटलेली गरिबाची भुकेने दामटी वळून देहाची मुटकळी करून मरून पडलेली प्रेतेंही मी पाहिली." शाहीर म्हणाला.

नानासाहेब विचारात पडले. त्यांच्यासारख्या विचारवंताला विचारांत टाकील असाच शाहीराने वर्णन केलेला वरील किस्सा होता.

पेशव्याच्या-राज्यात उपाशी राहू नये अशी काळजी घेण्यात येत होती पण ती फक्त ब्राम्हणाच्या बाबतींत....

पर्वतिवरल्या रमण्यांत स्वार्थी ब्राह्मणाची आपापसांत हजारो, लाखो रुपयाची वाटली जाणारी दक्षणा लुटण्याच्या वेळीं हाणामारी होई.

याच रमण्यांतून खिसे भरून बाहेर पडलेल्या आणि माजलेल्या ब्राह्मणांनी पुढें घाशिराम कोतवालाची वानवडीच्या अलिकडची फळबाग माकडाच्या कळपाने लुटावी तशी लुटली. आणि ...!

त्यांना शिक्षा देता देता चुकून त्यांची हत्या घडली म्हणून पुढें याच ब्राह्मणांच्या जातभाईंनी श्रीमंतांच्या वाड्यापुढें येऊन पांचजन्य केला.

आणि पुढें...!

नानासाहेब प्रतिकूल असताना श्रीमंतानी याच ब्राह्मणाच्या शिव्याशापाला भिऊन पुण्याची उत्तम व्यवस्था ठेवणाऱ्या घाशिरामाला स्वतःच्या हातानीं पर्वतीजवळ दगडाधोंड्यानीं लसणीचे तिखट कुटावे तसे ठेचून ठेचून मारले.

हे असें चालणार होतें.

आणि हे असें चालले होतें. लोकांना अन्न मिळत नव्हते आणि पुण्यात लक्ष ब्राह्मण भोजनाचे संकल्प शेठ सावकार सोडीत होते आणि तेच तेच ब्राह्मण रोज रोज जेवावयास येऊन तो 'लक्ष' आपल्या 'शेकड्या'च्या संख्येने पुरा करीत होते.

अशा ब्राह्मणाना ऐदी बनल्यानंतर, मग भागेच्या पाटावरबंस्या-कडून काम घ्यावेसे वाटले. चिलमीत काथ्याची गाठ कोंबावीशी वाटली आणि उत्तान शृंगाराच्या किळसवाण्या लावण्या लिहिणाऱ्या सगनभाऊ, होनाजी बाळ, प्रभाकर, अनंत फंदी याची घरे भरावीशी वाटली तर ते आश्चर्याचें नव्हते.

अशा या ब्राह्मण मंडळीत थत्ते, रामशास्त्री प्रभुणे यांसारखी काहीं मंडळी जिलबीला आणि बासुंदी पुरीला आपली अक्कल आणि सुचिता न विकणारी होती नाहीं असें नाहीं. परंतु......

परंतु बसून मिळणाऱ्या या गोड गोड अन्नाची चटक 'मिषें' बनूनहीं पुढें ब्राह्मणाकडून पोसली गेली.

आणि पुढे!

आणि पुढे टोपीवाले आले, आणि त्यानीहीं या पोट फुगलेल्या भटाच्या राज्याला लाचेचे लाडू फितुरीच्या तोफातून डागून आपल्या अंकित करून सोडलें.

आम जनतेतील अत्यंत विद्वान आणि सुशिक्षित म्हणून समजल्या जाणाऱ्या ब्राह्मण जातीची त्यावेळेला अशी परिस्थिती, त्या

ब्राह्मणांच्या दुर्दैवानें जन्मभर पाप करून थोडे पैसे खर्च करुन 'स्वर्गात जाण्याइतके' पुण्य जमा करूं पहाणाऱ्या श्रीमंत राजे महाराजे शेट सावकार यांजकडून करण्यांत आली.

गति नसली तर भोवरा भोवेळ येऊन खाली पडतो. पंख हलविले नाहींत कीं घार काळ्या कापडाच्या बोजक्यासारखा खाली आदळते.

तीच गोष्ट व्यक्तीची असते.

हालचाल थांबली, श्रम करण्याची त्याची सवय गेली की त्याची प्रगती संपली.

दशग्रंथाचे अर्थ न समजता केलेल्या पाठातरात जेव्हा पुण्यांत वाडे उठवण्याइतकें द्रव्य मिळूं लागले तेव्हा 'ब्रह्मतेज' ज्याला म्हणतात ते या पुण्यांतून नाहींसे होऊ लागले.

नानासाहेबांना हे सारे सारे आटवले. परंतु त्यावेळीं ते, हें सारें पुन्हा आठवण्यापलिकडे काहीं करूं शकत नव्हते.

"मी आपण सांगाल...नव्हे सागता आहात ती कामागिरी प्रेमाने करीन. तुमच्यावरील नव्हे, श्रीमंताच्या प्रेमामुळें नव्हे, मी हे काम मानवजातीच्या प्रेमासाठीं करीन. यासाठीं मला काहीं मोबदला नको." शाहीर म्हणाला.

नानासाहेब पुन्हा विचारमग्न झाले.

"आणि गडावरच तू रहात जा सध्या. दादासाहेबांच्या नवीन हालचाली सुरू आहेत. पुन्हा श्रीमंताच्या जिवास धोका येण्याचाही संभव आहे. पैशाने विकला जाणार नाहीं असा कुणीतरी माणूस गडावर श्रीमंतांच्या सान्निध्यात हवा." नानासाहेब म्हणाले.

"आपण बेफिकीर असा" शाहीर म्हणाला!

मग त्याला नानासाहेबांनीं निरोप दिला. एका मोठ्या काळजीतून हा बुद्धिचा सागर आता मुक्त झाला होता !

—०—

—८—

# पैजेच्या विड्यावरील लवंग !

वडगांवच्या लढाईत आपल्या कवाईती फौजेचे 'तीन-तेरा सहा-सोळा' झालेले टोपीवाला निमूटपणे सहन करूं शकत नव्हता.

त्यांनीं या पराजयाचे खापर उघडपणें राघोबादादाच्या डोक्यावर फोडिलें. ते म्हणत होते त्यातही पुष्कळ अर्थ होता. कारण "पुण्यांतील पुष्कळ सरदाराना आणि शिलेदारांना मी फितूर केले आहे आपण पुण्याच्या आसपास पोंचलो कीं ते आतून उचल घेतील आणि आपल्यावर चालून आलेल्या फडक्याच्या फौजेची पाठ फोडून काढतील" असे आश्वासन राघोबादादाने त्याना दिले होते,

आणि त्यावर विश्वास न ठेवण्याचें कांहींच कारण न दिसल्यामुळें त्याच्यावर विश्वास टेकूनच फिरंग्याची फौज अंबरनाथ बदलापूर नेरळ, वागणी, पेण, पनवेल मार्गे टार्कीत भराभर पुढे आली.

...पुढे आली आणि तळेगावच्या आणि वडगांवच्या दरम्यान असलेल्या खिंडीत कडक चामड्याच्या चढावाखालीं गोम चिरडली जावी तशी ती लाबड्या बनातीच्या पॅटा घातलेली ब्रिटिशांची फलटण मार्‍या मार्‍या हिंडी होऊन मोठा पराभव घेऊन माघारी फिरली.

.. हे झाले आणि गेले परंतु मानी फिरंगी हा पराजय आपल्या मनातून विसरूं शकत नव्हता परंतु दुर्दैवाने आतां मराठ्यांच्या राज्यावर हल्ला करताना उपयोगी पडणारे हुकुमाचे पान... राघोबादादा...त्यांच्या हातात नव्हते.



शिंदयांच्या पराक्रमी तलवारी राघोबादादाला आपल्याबरोबर ' कैदी ' म्हणून घेऊन आतां उत्तरेकडे वळत्या होत्या.

राघोबादादाची कटकट आतां कायमची मिटली असे समजून नानासाहेब आपल्या नवीन राजकारणाचे पाये खणू लागले होते.

कैदी झालेल्या दादासाहेबांचे एका व्यक्तिस्वातंत्र्या खेरीज सारे चोचले शिंद्यांच्या कैदेत ते असतानाही पुरविले जात होते.

त्याच्या आवडत्या कलावंतिणीचा ताफा या 'पराधीन' स्थितींतही त्यांच्या सान्निध्यात होता.

बकुळा त्यांना विडा देत होती.

' गुलाबी ' त्यांना शराबी पाजीत होती.

पोपटी त्यांना आवडतील अशा साड्या त्याच्या समोर त्यांना नेसून दाखवीत होती.

आवडा त्यांना चटीपट्टीची तंग चोळी घालून वळत्या पदरानें विलक्षण वारा घाली.

साळुंकी त्याच्यासाठी पुष्पशय्या तयार करी, आणि कमाल-खानी हारही गुंफुन ठेवी.

शेवंता त्याच्या हातात मोगऱ्याचे गजरे खुबीने घाली.

आणि त्यांची आवडती नायकीण चांदणी.. ...

चादणी ही त्यांचा जीव की प्राण होती, तिला गाणे शिक-विण्यासाठीं त्यांनीं उत्तर हिंदुस्थानांतून मिलाफखान नांवाचा एक सुप्रसिद्ध गवई आपला आश्रय देऊन जवळ ठेविला होता. ख्याल आणि ठुंबरी, गजल आणि कवालीत ती आता तरबेज होत चालली होती.

तिच्या सौंदर्याला सीमाची सरी नव्हती. कनोजच्याच कुशींत ती वाढल्यासारखी वाटावी असे सुगंधाचे सुस्कारे तिच्या अंगापांगाला लावलेल्या खुशबुतून नित्यशः सुटत.

राघोचादादा एक होशी होता तर स्वतः चांदणी सात होशी होती.

एकाद्या अप्सरेप्रमाणें तिचा दिनक्रम असे.

सकाळी सूर्याने माथ्यावर येऊन तिचे मखमली गिरदीवरील बेलियाने चिकचिकलेले काळे कुरळे केस आपल्या कनकमयी ऊबदार हाताने कुरवाळल्या खेरीज, ती आपल्या जागोजाग आरसे बसवलेल्या चंदनाच्या छपर पलंगावरून मुळी उठतच नसे.

ती जागी होताच उशागती आणि पायगती तिची उठावयाची वाट पहात बसलेल्या कुळंबिणी तिला मुजरा करीत.

मग आपल्या लाल माणकासारख्या जिवण्या विस्फारीत ती जांभई देई. रात्रभर झालेल्या जाग्रणाने आणि किमती मदिरेने लालबुंद झालेल्या विशाल डोळ्यावरल्या पापण्या ती मोठ्या कष्टाने उघडत आहे असे त्या वेळेला वाटे.

मग एक कुळंबिण तिच्या अंगावरला रेशमी रुजामा दूर करी.

आणि...!

हंसणाऱ्या त्यांना ती हसून म्हणे, "पलंगाखाली पडली असेल."

मग तिने सांगितलेल्या ठिकाणी शोधा शोध होई.

मग जे शोधले जाई ते सांपडे.

मग कुस्करली गेल्यामुळें सुरकुत्या पडलेली जरतारी सळयांनी विलोभनीय केलेली ओढणी ती आपल्या अंगावर टाकी.

मग एक दासी शोधून काढलेली कुंडले तिच्या कानांत घाली.

मग एक दासी तिचे मोकळे केस वेण्यांत गुंफू लागे.

मग एक दासी तिच्या कपाळावरले पुसलेलें कुंकू ठाकठीक करी.

मग एक दासी तिला केशर टाकलेल्या गरम पाण्याची चांदीची कासंडी आणून देई.

मग सांडपाण्याचे सतेले लकलकीत केलेल्या शिवरीच्या लाकडाच्या चौरंगावर ठेविले जाई.

मग ती खुळखुळून चुळा टाकी.

तोंड धुवून होताच विजेनें आजिरी ढगांच्या पार्श्वभूमीवर वळवळावे तशी ती आळोखे पिळोखे देई.

मसाल्याचे दूध पिऊन झाल्यावर ती तिच्या 'अंगूर' घोड्यावरून रपेटीला बाहेर पडे. शिंद्यांच्या छावणीचाच विस्तार बारा मैलाचा होता. त्या परीघाच्या आंत तिला हवे तिकडे हिंडण्याची मोकळीक होती.

सकाळीं साडेदहाला बाहेर पडलेली ती दुपारी एक वाजतां परत फिरे.

ती परत फिरे तेंव्हा ते मोठ्या दमाचे अरबी जनावरही घामाघूम झालेले असे. आणि लाल भडक साडी आणि लाल भडक कंचुकी करकचून नेसलेली चांदणीही घामाघूम झालेली !

तिच्या गौर आणि आरक्त अंगावरून निथळणाऱ्या घर्मबिंदूना हिऱ्याचा रंग येई आणि हिऱ्या सारखाच उन्मादक सुगंध येई.

पांढऱ्या सफेद 'अंगुरा'ला चांदणीने खिळा मारलेल्या टाचने छेडले कीं तो चिडे आणि आपल्या चार पातळ पायाच्या चालीने मैलामैलांच्या मखमलीचे अलवार कापड आपल्या तऱ्हेवाईक मालकिणीसाठीं विणू लागे.

घामाने थबथबलेल्या स्थितींत श्वासाचा तोल गेलेला असतांनाच ती खड्याची अफू मिसळलेली पानपट्टी चघळू लागे.

डोक्यावरले ऊन लाल, अंगावरली साडी लाल, दंडाना आकसणारी चोळी लाल, गळ्यातला कंठा लाल, नाकातली चमकी लाल, हातातला लगाम लाल, मुखांतला विडा लाल, विड्याखाली जिभली लाल, जिभलींवरले गाल लाल, सुटलेल्या केसातला वळलेला अगवळ लाल, पायातला चढाव लाल, मनगटावरली पौंची लाल...

गुलाबी नखावरले मेंदीचे गरम गिलावे लाल, नजरेतली धुंदीने धगधगलेली निशाणे लाल,

...सोळा वर्षांची सुगंधी संकेतस्थानें लाल, अतृप्त अभिलाषांच्या अधरावरल्या अखावऱ्या लाल...

तुफानाचा तडतडणारा ‘ हेलकावा ’ वाटणारी तिची घोड दौड लाल, त्या घोडदौडीकडे मत्सराने पहाणाऱ्या पाड लागलेल्या शेंदरी पानावरल्या पोपटांची चोच लाल आणि त्या आसरामच्या बारा मैलाच्या परीघात इकडे तिकडे वहिवाट करणाऱ्या शिंद्याच्या फलटणीतल्या शिलेदारांच्या पगड्याही लाल.



शिंद्याच्या शिलेदारात कान्होजीराव लगडायेवढा रुबाब कुणाचाच नव्हता आणि हा रुबाब शोभावा असेच त्याचे पराक्रम होते.

पाटीलबाबा त्याला आपला उजवा हात समजत.

आणि पाटीलबाबांचा डावा हात ! पाटीलबांबाचा डावा हात असणारा कृष्णाजीराव जाधव असामीही असाच करारी आणि कडवा होता.

शिपाई म्हणून सैन्यांत प्रथम दाखल झालेले हे दोन जवान आपल्या पराक्रमी पायानें एकाद्या जिन्याच्या पायऱ्या चढाव्या तशी बढती मिळवीत चढत गेले.

आता दहा हजाराच्या रिसाल्याचे ते शिलेदार होते.

त्यांच्या पराक्रमाचे इतिहास असे होतें कीं या दोघापैकीं सरस नीरस कोण हे ठरविणें मिनातवारीच्या मुष्कीलीचे होते.

दोघाचेही आचरण त्यांच्या सच्छील माता पित्याना शोभेल असेंच होते.

स्वतः पाटीलबाबांनीं जरी एकाद्या रंगेलघडीला त्यांना कांहीं खाण्या पिण्याचा आग्रह केला तरी हे ‘ तेवढें माफ करा ’ असे हात जोडून त्याना सांगत.

शिंद्यांच्या या दोन आवडत्या शिलेदारांच्या अंतःकरणाला लाच लुचपतीने वश करण्याचा प्रयत्न दादासाहेबांनी हस्ते परहस्ते करून पाहिला होता.

आणि त्या बाबतींत निराशा पदरी पडल्यानंतर आपल्या भात्यातला ‘ चांदणी ’ चा अमोघ बाण त्यांनीं बाहेर काढला होता.

‘ चांदणी ’ च्या देहाचे मोल देऊनच दादासाहेबांनी आपली पैशानें न जमणारी अनेक राजकारणें कांहींशी यशस्वी केली होती.

आणि आपला धनी आपणास असे करावयास लावतो याबद्दल चांदणीला प्रथम चीड आली तरी पुढें तिला बरें वाटले.

चाचंल्य हा तिचा स्वभावधर्म होता आणि जगातले सारे तिला हवे होते. आणि कांहीं साहस करावयाचा प्रसंग आला म्हणजे तिच्या कैफानें एरवी नरम पडलेल्या धमन्या धमन्याना तगवणा येई आणि तेवढ्या पुरते तिला बरें वाटे.

अशा तऱ्हेच्या चमत्कारिकपणातून सुखलाभ मिळू शकण्याची शक्यता असलेल्या चांदणीला पाच दहा मैलाची केलेली सैल लगामी-तली रपेट सुखदायक वाटे, हातातल्या काटेरी ‘अंगरा ’च्या अलवार पाठांची मऊ मलमल दहा ठिकाणीं उसऊन टांकल्या नंतर त्यातून निघणारे रक्ताचे थेंब टिपकतांना पहाता पहातांच तीं पुन्हा त्याच्या पोटाला खिळ्याची टाच मारी.

आणि वेदनांनी थरकलेल्या त्या प्रचंड घोड्याचे अंग धावता धावता शहारले कीं तिला आनंद वाटे…



एकाच डेऱ्यात कान्होजीराव लगड आणि कृष्णाजीराव जाधव रहात असत. परस्परांवर भावासारखें प्रेम करणाऱ्या या दोघाना आणखी एका ऋणानुबंधाने अधिक नजीक आणले होते.

कान्होजीच्या बहिणीशीच कृष्णाजीचे लग्न झाले होते. आपल्या भावाप्रमाणे ती बहीणही काळी सावळी परंतु तेजस्वी होती. तिच्या बोलण्यांत बोजडपणा नसताना धाक असे, तिच्या डोळ्यांत डळमळ

नसतांना 'गति' असे. घोड्यावर ती उत्तम बसे, वेळ पडली तर एकाद्याची खड्गानें खातरजमा करावयाचीही तिची तयारी असे.

तिचे वाचनही पुष्कळ होते. मोरोपंत वामनपंडीत, यापेक्षां तिला तुकारामाचे अभंग अधिक आवडत.

'काया–वाचा–मना'ने केवळ 'पती'ची चाकरी करण्याच्या त्यावेळच्या सतिच्यापेक्षा ती थोडी वेगळी होती. 'चाकरी' पेक्षां 'मदत' हा शब्द तिनें मनाशीं धरून ठेविला होता

गरीबाबद्दल तिला कळवळा होता. पण तिच्या दान धर्मातसुद्धा विचाराला प्राधान्य होते. अनाथांना आणि पंगूना ती सढळ हाताने मदत करी.

कधी कधी जी आपल्या पतीबरोबर छावणीतही असे. युद्धाची तिला भीती नव्हती. तोफाने तडकलेल्या बंदुकाचे गुडूम गुडूम आवाज, आणि तोफाने धुमसलेल्या वातावरणांतलि गुडूम आवाज ऐकून तिला डोळे मिटावेसे वाटत नसत.

प्रथम दर्शनी तिला कोणी सुंदर म्हटले नसते. परंतु ती बोलूं लागली कीं तिच्या तोंडावर एकप्रकारचे तेज चढे.

डोक्यावर पदर घेऊन विनयशीलपणाने आयुष्य कंठणाऱ्या या साध्वीला ज्ञानेश्वरीतला सहाव्वा अध्यायही समजत असे.

परमेश्वरावरील तिच्या श्रद्धेला एका दुर्दैवी घटनेनें कांही दिवस तडा गेला होता. प्राणापलीकडे जिच्यावर तिचा लळा होता अशा रमा या नांवाच्या मुलीचा मृत्यु हेच तें कारण.

रमा भाग्याची होती. ती जन्माला आली त्या दिवशींच एका चांगल्या युद्धाची फत्ते झाल्याची बातमी घेऊन सांडणीस्वार तिच्याकडे धावत आले.

ती एक वर्षाची झाली आणि कृष्णाजीच्या पराक्रमी खड्गाचे तेज वाढू लागले. ती दोन वर्षाची झाली आणि कृष्णाजीच्या पगडीवरील 'जर' वाढू लागली. ती पांच वर्षाची झाली आणि शिंद्यांनी पाच शाबासक्या आपल्या बलशाली हाताने कृष्णाजींच्या पाठीवर दिल्या.

आणि अशी रमा आपल्या नाजुक अंगोपांगाच्या जाई जुई मुदतीच्या तापाने गरम करीत एक दिवस देवाघरी गेली.

ती रहावी म्हणून दहादिशांच्या देवतांना या साध्वीने मनोभावे वाहिले.

ती जगावी म्हणून साध्वीने शंकराला सांकडे घातले. नवलोबाला नवस केले बहिरोबाला बर्फी दिली, अगस्तीला अभिषेक केला. भार्गवाला भक्तिभावाने वंदन केले.

रमाचे गरम माथे मांडीवर घेऊन ती आपल्या डोळ्यात आसू आणून देवघरांतल्या पुजिलेल्या देवाच्या मूर्ती डोळ्यासमोर आणून उद्गारली,

देवांनो ! आजवर मी तुमची मनोभावे पूजा करीत आले. माझी रमाही तुमच्या तीर्थावर आज पाच दिवस तरते आहे. आणि माझे शरीर मी गेले आठ दिवस तीर्थावरच जगवते आहे. तुमच्यावरल्या माझ्या भक्तींत आणि विश्वासांत आत्तापर्यंत एका तसूनाही फरक नाहीं.

वैद्याने आशा सोडली आहे. परंतु मी कांहीं सोडली नाहीं. आणि सोडणार नाहीं. पार्थाला पाठीमागे घालून भारतीय युद्धात कर्ण, द्रोण, भीष्म यासारखे अतिरथी महारथींच्या शरवर्षावांतून त्याचा प्राण वाचवणारे तुम्ही माझे असतांना मला आशा सांडावयाचे कारण काय ? द्रौपदीची लाज तुम्हीच दुःशासनापासून राखलींत, तुम्हीच खान प्रतापगडावर राजाचा खुर्दा करावयाला आला तेव्हां इवल्याशा चार वाघनखात अठरा अक्षौहिणींचें सैन्य घेऊन दडून बसलात, जनेची ज्वारी दळणारें तुम्ही, तुकारामाला सदेह सद्गती देणारे तुम्ही, संभाजीच्या अमली जिभेवर त्यांच्या अंगावर सफेद कांहीं राहिले नसताना धर्माला तारक होणारा आकाशवाणीसारखा उदात्त उग्दार ठेवणारें तुम्ही......

ध्रुवाला कडेलोटानंतर फुलासारखे झेलणारे तुमचेच हात..

आणि तुमचे ते हात काय मात्रांची मात्रा चालेनाशी झाली नाहीं म्हणन माझ्या मांडीवरल्या या रमेला यमदूताना नेऊ देतील...

माझ्या देव्हाऱ्यातील देवांनो माझे अश्रू तुम्हाला दिसतात... आणि माझे क्षणाक्षणाला हिच्या काळजीत कातरून गेलेलें काळीजही तुम्हाला दिसतें. परंतु हे मी तुम्हाला काय विचारते आहे. सर्वसाक्षी परमेश्वराला खरेच हे मी काय विचारते आहे! सूर्यचंद्राच्या दुर्बिणींतून पृथ्वीचा परीघ पारखणाऱ्या पराक्रमी परमेश्वराला खरेंच हे खुळ्यासारखे मी काय विचारतें आहे.

देव भावाचा भुकेला आहे. माझ्या इटुकल्या रमेला घटके घटकेनें मी त्याचें तीर्थ पाजत आहे!

कुणाची माय व्यायली आहे माझी ही रमा माझ्या मांडीवरून हटकून न्यावयाची! कृतांत आला तर त्यालासुद्धां परतावयाला हवे...

खरेंच परतावयाला हवे. आपल्या कंठात तीर्थाच्या उदकाचा ओलावा सांभाळणाऱ्या या कंठाभोंवती फास टाकणाऱ्या यमदूताला हातातली अवसानें कायमची गमवावी लागतील.

खरेंच माझी रमा...

खरेंच मी आणि माझी रमा यांची ही सायसाखरेची मलमल मखमलीची नाजुक गाठ तोडण्याची ताकद असलेली धार दुनियेतील कोटल्याही लोहाराने कोणत्याही हत्यारावर आजवर चढाविली नसेल...

आणि त्या प्रल्हादाच्या पालनहार परमेश्वराला माझ्या मऊ मांडीवरली ही हळुवारातली हळुवार रमा उचलून दगडाधोंड्यांत टाकाविशी कशी वाटेल!

फुलातली फूल आणि हुलीतली हूल असलेली माझी रमा!

खरेंच माझी रमा...

परंतु कृष्णाजींची निजामाला आणि हैदराला पाणी पाजणारी समशेर काळाचा नाजुक पाश तोडावयाला बोथट ठरली...

आणि विधिलिखितच विलक्षण असल्यामुळे रमेच्या रक्षणासाठी रमाकांताचा अहोरात्र धावा करणाऱ्या त्या साध्वीला शोकावर्तांच्या बुंजांवरले काळे निशाण व्हावें लागले.

मध्यरात्री महानशोकाचा मध्यबिंदू झालेल्या तिच्या मनानें मग भावभक्तीच्या मर्यादांची मान मोडून मुरगळून टाकली.

तिने देव्हाऱ्यातले देव, आपल्या डोक्यापासून दूर करूनच आपल्या माडीवरल्या अचेतन रमेस उचलणाऱ्यांना उचलून दिले.

आणि दुसरा दिवस उगवल्यानंतर कचऱ्याच्या पेटीत जन्मदातीने जबरदस्तीनें टाकून दिलेल्या मुलानें पुढच्या आयुष्यांत ठेच लागल्यानंतरही ' आई ' म्हणू नये, तसे त्या सच्छील स्त्रीने पुढें देवाचे नाव त्या क्षणापासून दूर केले.

भक्ताचे परिवर्तन असे विभक्त होण्यात झाल्यानंतरही आपल्या एरवीच्या वर्तणुकींतील चागुलपणा तिने सोडला नाहीं. सत्याला आणि शीलाला ती पूर्वीसारखीच बिलगून राहिली-

फरक पडला तो येवढाच पडला कीं आत्मकर्तृत्वाचे बळ सर्वांत अधिक असें तिला वाटू लागले. ईश्वरावर सर्वस्वी भार टाकून त्याच्याच भक्तींत आपल्या भाग्याचे धागेदोरे गुंतवण्यापेक्षां कांहीं करीत रहाणें अधिक बरे असें तिला वाटूं लागले.

आणि मग जखमी सैनीकांच्या बायकाना ती मदत पोचवूं लागली अडीअडचणींत सैन्याचे पगार वेळेवर मिळत न मिळत तेंव्हा तीं स्वतःच्या पदराला खार लाऊन त्यांची अडलेली चूल निखाऱ्यानें फुलवी.

कृष्णाजीच्या प्रत्यक्ष ताब्यात दादासाहेब होते. आणि त्या कृष्णाजीची स्त्री ही अशी होती.

आणि अशा स्त्रीला शोभेल असाच कृष्णाजी सालस होता. मिळालेल्या वैभवानें त्याच्या हातात गर्वाचा नारळ द्यावयाचा प्रयत्न केला परंतु तो त्यानें फेकून दिला.

या कृष्णाजीला लाखाची लालूच दाखऊन दादासाहेबानी आपली सुटका करून घ्यावयाचा प्रयत्न करून पाहिला होता. परंतु तो संपूर्ण विफल झाला.

तो विफल झाल्यानंतरच दादासाहेबांनीं अनेकदा अशा बांक्या प्रसंगीं फत्तेह करून परतलेला आपल्या भात्यांतील ' चांदणी ' नांवाचा अमोघ बाण त्यावर रोखला होता.



आणि एक दिवस सकाळच्या रपेटीत घोडा तुफान उडवित चाललेली चादणी कृष्णाजीच्या डेऱ्या समोरून जात असताना एका-एकी खाली आदळली.

नोकराचाकरांची ओरडाओरड ऐकून एका तुर्की माणसा-जवळून कंदाहरकडल्या समशेरी खरेदी करण्यांत गुंतलेला कृष्णाजी डेऱ्याबाहेर आला.

मूर्च्छित पडलेल्या चांदणीला त्यानें ओळखले. कैदेत असलेल्या खाशाची ही आवडती 'रक्षा' आहे असे ध्यानांत येताच त्यानें तिला अलगद आपल्या हाताने भुईवरून उचलले आणि आपल्या डेऱ्यांत नेले.

कांहीं वेळ मलमपट्टी करण्यांत गेला. कांहीं वेळानें ती शुद्धीवर आली.

" माफ करा हं शिलेदार ! तुमच्या किंमती हातांना तसदी घ्यावी लागली माझ्यासाठीं" चांदणी कृष्णाजीला म्हणाली.

त्या मूर्च्छा सरल्या नंतरच्या पहिल्या क्षणापासूनही तिच्या पातळ पापण्या सुंदर रूपाच्या कृष्णाजीच्या आसक्तीने ओल्या झाल्या.

एका दगडाने दोन चिमण्या चिवडाव्या तशा या सुंदर माण-सांचा सहवास घडता घडता दादासाहेबांचीही सुटका होणार होती.

" पालखी तयार आहे ! तुम्हास खाशांच्या डेऱ्याकडे पोचती करू काय ? " कृष्णाजीनें विचारले.

" आपली मर्जी खप्पा होत नसेल तर दासीला आजची रात्र इथेंच घालऊं दे. आता सूर्य माथ्यावर आला आहे. माझा ऊर अजूनही

पडल्याच्या भीतीने धपापतो आहे. आतांच इथून जाणे मला मानवा-वयाचे नाहीं. एवढे करा कीं माझा घोडा तेवढा कुणालातरी सांगून परत लाऊन द्या...आणि खाविंदाना सांगा की चांदणी अपघातामुळे मूर्च्छा येऊन तुमच्या डेऱ्यांत पडली आहे." चांदणी म्हणाली.

" परंतु दादासाहेबांना तुमच्या भेटीला इकडे येता यावयाचे नाहीं ! " कृष्णाजी म्हणाला.

" पाटिलबाबाच्या हुकुमाचे तामिली करणारे आपण नेकजात आहांत ! परंतु... " एवढे बोलून चांदणी गोड हसली.

" प्रत्यक्ष देवी भवानीने येऊन सांगितले तरी धन्याचा हुकुम मी तोडणार नाहीं. " कृष्णाजी म्हणाला.

मग चांदणीने आपले गाल रुसव्याने फुगविले

त्या रात्री ती छावणीतल्या बंदोबस्ताची खातरजमा करावया-साठी बाहेर पडणाऱ्या कृष्णाजीला म्हणाली.

" उद्या सकाळीं मी आपल्या जागी जाणार. आता तुमची माझी मुलाखत होणार नाही. जाताच आहांत तर जा, परंतु माझ्या हातची पानपट्टी तरी खाऊन जा."

तिचे हे बोलणे ऐकून कृष्णाजी हंसला.

तो हंसतांच चांदणी गुणगुणली....

" हंसू नका बाई हंसू नका !
नव्या नवरिला नखलु नका !
चवाळिची शेंग कवळी ही
दुधाची साय ढवळी ही
पलंग पहाता
रंग उडवता
हळूच पदरा द्या झटका

तिच्या या गुलाबी आणि गोड गुणगुणण्यानें कृष्णाजीला समाधान दिले.

तिच्या मग तो अगदी जवळ जाऊन म्हणाला....

"द्या ! द्या ! पट्टी द्यावयाची तर द्या, मला आतां उशीर होतो आहे.

मग चादणीने चांदीच्या तबकातून पान घेतले...

आणि सोन्याच्या डब्यातून सुपारी, केशर, जायपत्ती, कात चुना सारे साहित्य पनावर ठेऊन झाल्यावर तिने त्याची घडी केली. आणि ती घडी कृष्णाजीच्या हातात देत ती भृकुटी वक्र करीत म्हणाली,

सारी पट्टी तयार झाली आहे. फक्त आपण आपल्या हातांनी लवंग लावा म्हणजे झाले,

परंतु लवंग न लावतांच कृष्णाजीने ती पट्टी तोंडात घातली.

कांहीं वेळानें त्या डेन्यांतुन शुध्दी हरपलेल्या कृष्णाजीला आपल्या आसक्त डोळ्याची दृष्ट लाऊन चादणी बाहेर पडली

आणि दुसरा दिवस उमाळ्यावर आला तेव्हां शिंदयांच्या लष्कराच्या पोलादी चौकटीतून दादासाहेबाचे चित्र गायब गहाळ होऊन गेले होते.

— ० —

— १० —

# कोळ्याच्या जाळ्यांतल्या मासळ्या........!

राघोबादादाने शिंद्याच्या फौजेतून आपली सुटका करून घेऊन जी भरारी मारली ती थेट सुरतेला !

या नव्या बातमीचे दस्त घेऊन शिंद्याकडून तातडीचे सांड-णीस्वार पुण्यास येऊन दाखल झाले.

साऱ्या दरबारला या बातमीने धक्का दिला. मुंगीला वाव मिळणार नाहीं अशा कडक शिस्तीच्या शिलेदारांच्या पहाऱ्यातून राघोबासारखा खासा सुटून जातो याचा अर्थ काय लावावयाचा...?

कांही दरबारी लोकांनी याचा अर्थ असा लावला कीं राघोबाने पाटीलबाबाना आपल्या बाजूला करून घेतले.

परंतु खुद्द नानासाहेबांना तसें वाटले नाहीं. त्यांना तसा पुसटता संशय सुद्धा आला नाहीं.

तसें त्यांना वाटलें नाहीं याला अनेक कारणे होती. त्याना पाटीलबाबाचा स्वभाव पूर्ण ठाऊक होता.

असली फंद फितुरी करावयाचे राजकारण करावयास जे काळे अंतःकरण लागतें तें पाटीलबाबापाशीं नव्हते.

ती गफलत झाल्यानंतर ती ज्यामुळें झाली त्या कृष्णाजीवरली पाटीलबाबांची मेहेरनजर एकदम गरम झाली.

चांदणीने करून दिलेल्या पानपट्टीत धोत्र्यासारखे कांहीं गुंगीने गुंगवणारे पदार्थ घातलें होते.

विश्वासाने त्यानें ती पट्टी खाल्ली आणि ते बेशुद्ध पडताच...!



पुण्याला नानासाहेबांना राघोबाच्या पळून जाण्याच्या मजकूर कळवितांना लिहिलें होते.

लिहिलें होते कीं—

"......कृष्णाजीच्या हातून त्या रात्री पहाऱ्याच्या चोक्या तपासण्याच्या कामांत गफलत झाली. आता कृष्णाजीच्या हकिकती वरून खाशाच्या मर्जींतल्या चांदणी नांवाच्या छिनाल नर्तकीनें आमच्या शिलेदाराच्या डेऱ्यासमोर अपघात होऊन घोड्यावरून पडावयाचे नाटक केल. पडलेल्याला हात द्यावयाचा आमचा शिरस्ता! पुढे, निवारा दिलेल्या नागीणीने शिलेदाराला......असा चावा घेतला. यापूर्वी या आमच्याकडल्या कृष्णाजीला लाख रुपयांची रोख रक्कम आणि थोरल्या थोरानी मस्तानीसाठीं घडविलेला एक बोरा येवढाल्या सत्याहत्तर मोत्याचा अमोल कंठा आपल्या सुटकेसाठीं लाच म्हणून देऊ केला होता, परंतु आमचे शिलेदार आमच्याच दानतीचे. अशा कृष्णाजीलाही मी या गफलातीनंतर त्याच्या जावजबाबाला कांहीही किंमत न देतां कामावरून या क्षणाला दूर करून टाकलें आहे.

आपल्याकडून आधार दिला गेला तरच त्याला आमच्याकडे चाकरीची आता आशा आहे.

आपल्या प्रत्यक्ष दर्शनाला आणि झाल्या गफलतीबद्दल श्रीमंतांपुढें हात जोडावयाला पुण्याला यावे अशी मनिषा फार...

...परंतु 'भरारी'ला अवसान यावयाच्या आंत आपणाकडून काहीं राजकारण जुळविलें जाणें शक्य आहे म्हणून आम्ही आहोत तिथेंच थांबतो. उत्तरेकडली सारी डर आपल्या चित्तावेगळी आपण ठेवावी. शिंद्याची सलामत समशेर इकडल्या साऱ्या सतलतनींना सवाईशह द्यावयाला आपल्या आशिर्वादानें आणि मेहेनतीनें मजबूत आहे.

आपण बुद्धीचे सागर आहांत, सारे जाणतच आहांत. आम्हावर विश्वास टेऊन आपण तिकडल्या उलाढालीसाठीं नागपूरकर भोसल्यांना कांहीं हालचाल करावयास सांगितलींत तरी हरकत नाहीं.

फिरंगी टोपीवाल्याविरुद्ध सातासमुद्रापलिकडे कोणी दमदार माणूस उठलेला आहे अशी बातमी मुंबईकडून मिळाली.

या संधीचा फायदा आपण घ्यावयाच्या विचारातच असाल.

सध्या निजामवरले पटवर्धनाचे दडपण दटावणीचे आहे तें सैल करावे. तसेंच हैदरलाही हुज्जती पलिकडे टेवावे. भोसले, हैदर, आणि निजाम अशी आपल्याशीं हात मिळावणी करून टोपीवाल्यांचा येळकोट करावा अशी मल्हारी मार्तंडाचीं सदिच्छा असली तर तसे घडेल.

समुद्रापारचे पारिपत्य करतांना ‘ दाढी ’ जवळची केली तर ‘ शेंडी ’ तुटावयाची नाहीं.

त्यातून तुम्हाकडले ‘ तें ’ काहीं अर्बुजी, तुर्की, नव्हेत. इकडेच वाढलेले, इकडेच पोसलेले ते खाविंद आहेत. धर्मानें नसले तरी देशानें तें आतां आपलेंच आहेत. प्रसंग पाहून हुज्जत घालतात तीं घालोंत परंतु परकीयाच्या पारिपत्यात ते आपले म्हणावे असेंच जवळचे आहेत.

हैदर, तुम्ही, निजाम, भोसले जिरेटोप घालून एकत्र आले तर फुट पाडावयाचा पवित्रा टाकलेला फिरंगी धूळ खात खात आपण पुढें करू त्या तहाच्या कागदावर सहीचे दस्तखत करावयास तयार होईल.

सेवकानें जास्त काय लिहावे. आपण सारें समजणारे आहांत दहादिशांचे कानोसे आपल्या जवळ. मी तल्वार धरणारा ! ”

शिंद्याचे हें पत्र वाचताच नानासाहेबांनीं त्यांना उत्तर पाठविलें. त्यांत त्यांनी कृष्णाजीची शिलेदारी त्याला परत द्यावयाची ओळ लिहिली आणि पुढे म्हटले कीं आपण लिहितां त्यात घेण्यासारखे पुष्कळ आहे आणि...



नागपूरकर भोसल्याना, हैदरअल्लीला आणि निजामाला आपल्याही हातची नानांनी पत्रें लिहिली.

आणि टोपीवाला !

जनरल गोडार्ड हा कमालिचा कावेबाज समशेर बहाद्दर कवाईती फौज घेऊन कलकत्त्याच्या किनाऱ्याला डावी घालून मुंबईकडे येऊं लागला...

तो मुंबईस येतांच त्यानें नानासाहेबाना कळविले कीं " पुरंदराच्या तहात कांहीं कलमे सैल लिहिली गेली आहेत. "

नानासाहेबांनी त्यास उत्तर दिलें कीं सध्या " श्रीमंतांच्या तब्येतीत नरमाई आहे. पुढें कधीं तरी त्या जुन्या कागदातल्या सैलपणाकडे ध्यान देऊ. "

याचवेळीं त्यानीं नागपूरकरांना वेळ आली तर बंगालवर चालून जावे आणि निजाम हैदराने पटवर्धनाच्या सहकार्यानें मद्रासची मुंडी कोंढीत धरून मुरगळावीं, असे कळऊन ठेविले.

परंतु......

देशाचे भवितव्य जेव्हा काळे निळे असते तेव्हां धनदौलतीच्या अभिषाना विश्वविजेत्या तलवारी बळी पडतात.

हेस्टिंग्जने दिलेले सोळा लाख रुपये घेऊन नागपूरकर भोसल्यानीं नानासाहेबाना दिलेला शब्द विसरून टाकला.

गंतूरचा मोठा जुमला परत मिळताच निजामाला आपल्या घोड्यावरले [illegible] [illegible]गावीशीं वाटली.

ह[illegible] [illegible]न आपल्या नानासाहेबाना दिलेल्या वचनाचे पालन केले.

आणि असे फासे उलटे पडत असतांना तिकडे गोडार्डने अहमदाबादची अदालत काबीज केली. आता त्याची नजर पुण्याकडे वळली होती.

याच वेळी वास्तविक नानासाहेबांवरचे आभाळ फाटावयाचें !
परंतु...

परंतु कृष्णाजी कांहीं खासे लोक घेऊन वादळाच्या वेगाने दक्षिणेत आला आणि गनिमी काव्याने त्यानीं पुण्यावर चालून जाणाऱ्या गोद्दार्डची रसद वारंवार कुर्तडावयास सुरवात केली.

उत्तरेस उतरलेल्या टोपीवाल्याच्या टोळींना शिंद्यांच्या समशेरीच्या लकलकत्या मशालींनी जाळून टाकले.

आणि म्हैसूरकडल्या हैदरानें आपल्या वाघनखाने हेस्टिंग्जच्या डोक्याला हयातभर आठवेल असा ओरखडा घेतला.

आणि मग हेस्टिंग्जने शिंद्याना मोठेपणा देऊन आपल्या हातातील खड्ग एकदाचे म्यॅन केले; आणि सांगीतले,

" तुम्ही दिल्लीत काय वाटेल ते करा, आम्ही तिकडे तुम्हाला ताणणार नाहीं. आणि आमचा पुणे दरबारशीहीं बरोबरीच्या नात्याचा तह तुम्हीच करून द्या.

सतरा पाच सतराशेला साल्बाई येथे या तहाच्या वाटाघाटी झाल्या.

तहही तिथेंच झाला. जाळ्यामधल्या माशाला जशी कोळ्याशी हुज्जत घालावयाला येत नाही तसेंच या वेळीं टोपीवाल्यांचे झाले.

राघोबाचा पक्ष त्यांना सोडावा लागला.

———

— ११ —

# कारंजावरलें काळीज

हैदरच्या पराक्रमी छाताडांतून अखेरचे सूक्ष्म स्पंदन पैगंबराकडे पावते झाले तेंव्हा नानासाहेबांना आनंदही झाला आणि दुःखही झाले.

एकट्या हैदरनें मद्रासपर्यंतचा मायना आखून मन्रोसारख्या मजबूत मार्शलला हवालदील केले अर्काटवर त्यानें आपला हिरवा बावटा लावला. कर्नल बेलीच्या फलटणी ऊस कापावा तशा कापल्या.

आणि त्याच्या धाकांत धमाल उडालेल्या हेस्टिंग्जने मग मराठ्यांशीं इकडे तह करून टाकला. वास्तवीक या तहाला मराठ्यांची शिक्का मोर्तब लागावयास नको होती. परंतु पाटिलबाबांच्या आग्रहाला बळी पडून नानासाहेबांनी त्या तहाला सम्मती दिली. या वर्तनाने हैदर अगदीं एकटा पडला. शिंदे शूर खरे परंतु ' भडोच ' मिळवण्याकरतां त्यांना हा तह घडऊन आणावा लागला.

आणि शिंद्याच्या मध्यस्तीमुळें पुणें दरबारातील त्यांचे महत्व एकदम शतपटीनें वाढलें. यापुढें इंग्रजांशी बोलणें बोलावयाचे ते शिंद्यांच्यातर्फे असा प्रघातच पडून गेला......

मराठ्यानीं अर्ध्या रंगलेल्या डावातनं आपले खड्ग म्यन केलेलें पाहूनही हैदरनें कपाळाला हात लावला नाहीं. तो लढत राहिला.

...विजेच्या लोळासारखा तो मद्रासहून मागे फिरला. कर्नल बेलीवर त्यानें अशी तल्वार फिरविली कीं त्याच्या सैन्यांतील शिपायांना जाम जुदा करितांना ' अमेन ' ही म्हणायाला फुरसत मिळाली नाहीं.

परंतु ...' पोर्टोनोव्हो ' जवळ त्याचा पराभव झाला.' कूट ' नांवाच्या कुशल कर्णधारानें आतां पराद्विपस्थांच्या सेनेचे सेनापतीत्व स्वीकारलें होते.

' पोर्टोनोव्हो 'ला कूटला ' पाठ ' दाखऊन हैदर मागे फिरला. त्याच्या पाठलागावर नऊ नव्या दमाच्या गोऱ्या फलटणी निघाल्या. त्यांनी हैदरला ' पालिखोर 'ला हटकलें. आपल्या ' पिछाडी 'चे शेपूट तुटू देऊन हैदरने आपल्या बाकीच्या सैन्यासह ' शिवालिंगगड ' गांठले. कूटने त्याला तेथें गाठले. परंतु तेवढ्यांत नानासाहिबांच्या स्वतःच्या विश्वासातला एक माणूस हैदरकडे निरोप घेऊन आला.

तो निरोप आशादायक होता. फ्रेंच सैन्य इंग्रजाच्या आरमाराच्या आतिशबाजीला बरोबर उत्तर देत देत पूर्वकिनाऱ्यावरती याच सुमारास उतरले.

त्या फ्रेंच सैन्याशीं हातमिळवणी होताच हैदर पुन्हा घवघव्यासारखा उसळला. त्यानें कूटच्या कब्जातले कडलोर पुन्हा काबीज केले.

त्याच्या ' बापसे सवाई ' असलेल्या बेट्याने टिपूने तंजावरला कर्नल ब्रेथ वेटचे सारे सैन्य आपल्या गरम बंदुकीवरल्या नरम संगीनींनीं ठायीं ठायीं भोसकून काढले.

आणि चक्रयुद्धांत सापडलेला ' हैदर ' मुलाच्या पहिल्या पराक्रमाची पुस्ती वाचता वाचता याच वेळी पैगंबरवासी झाला.

आणि वडिलांच्या मृत्युच्या दुःखानें हृदयांतल्या दयेच्या भावना रागाच्या दुआचात थिजऊन टाकलेल्या टिपू सुलतानानें बंगळूरला आणि बिदनूरला आपल्या सैन्याच्या काढण्या लावल्या...

एवढ्यांत इंग्रजानी फ्रेंचाशी वेगळा तह केला. आणि मग टिपूही तहास तयार झाला.



शाहीराने आपल्या सहवासांत श्रीमंत सवाई माधवरावांना अनेक सद्गुणाची दिक्षा दिली. परंतु कांहीं वर्षे लोटतात तोंच त्याच्या मोठेपणाचा मत्सर वाटल्यामुळें श्रीमंतांच्या सान्निध्यांतल्या काहीं मतलबी लोकानी त्याच्या विरुद्ध नाहीं नाहीं त्या कंड्या पिकविल्या.

...आणि ' हक्का ' आणि ' धक्का ' यांची किम्मत सारखीच करणाऱ्या संशयी गोपाळानें मग श्रीमंतांचा निरोप घेतला.

...मग त्या पुढल्या काळांत गोपाळानें आपल्याच गांवातल्या शेतकऱ्याच्या मुलांना धूळपाटीवर मुळाक्षरांची ओळख करून द्यावयास सुरवात केली.

त्याला असें वाटत होतें कीं श्रेष्ठ कवीचे खरें कर्तव्य ज्ञानाची ओळख सामान्य जनाना करून देणे हेच आहे.

" आणि असा हा ' ज्ञानदीप ' हातात धरून पुढे त्यानीं सह्याद्री पालथा घातला, पुढें त्यानी सातपुडा पालथा घातला....

त्याच्या या ' खुळे ' पणाला सारे प्रतिष्ठित शाहीर हंसत.

ते म्हणत ' लावणी ' लिहावयाची सोडून हा गोपाळा हें काय करतो आहे.

ते म्हणत, वृत्तात आणि छेदात कवने करावयाचे सोडून हा गोपाळा असे काय मोकळे लिखाण लिहित आहे.

ते म्हणत या गोपाळाच्या या स्वैर प्रवृत्तीच्या पोवाड्यांना 'काव्य' कोणीच म्हणणार नाहीं.

परंतु गोपाळाने या थुंकणाऱ्यांच्या पारोशा तोंडाकडें न पहाता आपले प्रगतीपर पाऊल पुढेंच टाकीत हयातभर प्रवास केला.

आणि असे कर्तव्य करित असतांना त्यानें सहस्त्रमुखानें पंचवटींतल्या एका पर्णकुटींत मरणाच्या हातांत आपला हात दिला.

तो मेला...!

कुठे मेला ! केव्हां मेला !

छेः छेः महाराष्ट्राला त्याबद्दल त्यावेळीही कांहीं माहिती नव्हती...!

आणि आजही...!



तळ्यातल्या गणतीचें दर्शन घेऊन श्रीमंत पाटीलबाबांना बरोबर घेऊन पुन्हा नौकाविहार करूं लागले.

आता आसपास कोणीच नव्हते वल्ही सुद्धां ते वैभवसंपन्न चार हातच मारीत होते.

चांदणे टिपूर पडले होते. पारिजातकाच्या फुलांचे नको तेवढे पीक वरच्या आभाळात पिकले होते. आणि वरून केवड्याच्या पिवळ्याधमक पानात बाधून ती पृथ्वीवर सारखी फेकली जात होती.

दूर झालेले तें विघ्नहर्त्यांचे मंदिर एकाद्या गुलाबी स्वप्नात पाहिलेल्या दुधाच्या पेल्यासारखे दिसत होते.

डोळ्यासमोरच्या आंबरायांना कोकिळा आपल्या कंठातील पंचमाने विरघळून टाकीत होत्या.

त्या चांदण्यांत श्रीमताच्या पगडीवरील पाचूंचा मोटा तुरा पाटिलबाबाच्या कंठातील हिऱ्याच्या कंठ्याशी हुज्जत घाली तेव्हां चंद्र-किरणांना हिरमुसले वाटे.

पाटिलबाबानी श्रीमंताना अगदीं प्रसन्न करून सोडले होते. गेले काहीं दिवस त्यानी आपला मुक्काम पुण्यातच ठेविला होता.

वानवडीला त्याच्या कवाईती फौजानीं आपले डेरे दिले होते. त्या सैन्याची संख्या एवढी होती कीं पुण्याच्या बाजाराची धारणा दहापटींनी वाढली.

वास्तवीक ते पुण्यास आले तें अलिजा बहादुर आणि होळकर याचा त्याना जो वारंवार त्रास होत होता त्याची दाद मागावयासाठीं! त्याजबरोबर त्याना श्रीमंताना हेहि सांगावयाचे होते कीं टोपीवाला टिपूशी हुज्जत घालतो आहे त्यामधे निजामाप्रमाणें मराठ्यानीही आपल्या बाजूनें हात वर उचलावे अशी त्याची इच्छा आहे. परंतु'...

या 'परंतु' चा अर्थ पाटीलबाबानीं फार सूक्ष्मपणे श्रीमं-ताना समजाऊन सांगितला.

काशीवरून येताना, यात्रा करुन येताना गंगेच्या पाण्यानें गड्डू भरून आणावे तसे शिंदे उत्तरेतून दक्षिणेत आले होते.

दिल्लीच्या बादशहाची कुलमुखत्यारी (वकील ई मुत्लक) श्रीमंतासाठीं घेऊन आले. यासाठीं दरबार भरला तेव्हां पाटील श्रीमंतांचे जोडे खाकेत मारून जवळच उभे राहिले. आणि श्रीमंतांनी त्या गोष्टीबद्दल नापसंती दर्शवितांच तो उत्तरेकडला 'बाक' हंसून म्हणाला "श्रीमंतांच्या आश्रयानें सारे आम्हांला लाभले. आम्हीं आपल्या आश्रयानेंच जमिनीवरले आंबाऱ्यात चढलो. परंतु वटवृक्ष कितीही वाढला तरी त्याच्या पारंब्यांची झेप नम्रभावानें मूळ बीजाच्या दिशेनेच नमस्कारासाठीं खालीं होते"

पाटीलबाबांच्या बोलण्यानें श्रीमंतांना निरुत्तर केले.

त्या वेळीं तसे झाले परंतु आज श्रीमतांनी त्यांना निरुत्तर केले.

कारभारीपणा, आपणास मिळावा याबद्दल पाटीलबाबानी श्रीमंतांजवळ शब्द टाकतांच.. .

वल्ह्यावरले हात बाजूला काढून ते पाटीलबाबांच्या खांद्यावर ठेवीत तरूण पेशवे नानासाहेबाचे आपल्यावरील उपकार आठवीत म्हणाले,

" शिंदे, तुम्ही माझे हात आहांत आणि नानासाहेब माझे मस्तक आहेत खड्गाला डोक्याशिवाय आणि डोक्याला खड्गाशिवाय कवडीचे मोल नाहीं. आणि तुम्हां दोघाशिवाय मला तरी काय मोल आहे !

मग पाटीलबाबा हंसेल.

मग श्रीमंतांनी स्वतःच्या हातानें आपल्या पानदानांतून त्यांना विडा दिला.



या विड्याचा ओठावरला रंग विटला असेल किंवा नसेल.—

महाराष्ट्राच्या दुर्दैवाने...नानासाहेबांच्या दुर्दैवाने पाटिलबाबा नवज्वराने आजारी पडले. आणि कांहीं दिवसानंतर दिक्पालाना न पेलणाऱ्या पराक्रमाचे धनी असणारे ते काळेसावळे शरीर एका लहानशा 'छत्रींतले' रहस्य होऊन गेलें.

काळ धावत होता. दिवस रात्रीचे राधाकृष्ण रामलक्ष्मणाप्रमाणें स्कंधावर घेऊन काळ हनुमंतासारखा धावत होता.

बारा महिने......

फक्त बारा महिने पुढें गेले...

तिनशेंपासष्ट दिवस...

आणि...

◆ ◆ ◆ ◆

दसऱ्याच्या दरबारानंतर सिमोल्लंघनाच्या वेळीं अंबारींतून खाली उडी घ्यावयाचा श्रीमंतांनी प्रयत्न केला...

आणि...

त्यानंतर बरोबर दोन दिवसांनी रायानें गणपतीमहालातील बारींतून खूप खूप उंचावरून आपला देह झुगारून दिला.

◆ ◆ ◆ ◆

आणि कांहीं वेळाने खर्ड्याच्या लढाईतील विजयानें खदखदलेलें काळीज कारजांवर पडलेलें आढळलें. ' कस्यारीवरलें लिंबू कस्यारी-वेगळे झालें

—०—

—१२—

# रवि मावळला !

पर्वतीच्या पायऱ्या शांतपणे नानासाहेब वर चढत होते. संध्याकाळ झाली होती. मुलासारख्या वाढवलेल्या सवाईमाधवरावाला अपघातानें मरण देऊन काळ पुरुष पुढें चालला होता.

आणि नानांच्या पापण्यांतून कैदी होऊन पडलेल्या आसवांचे अर्घ्यदान घेत आजही रवि मावळत होता.

'पुढें काय करावयाचे ?'

हा प्रश्न नानासाहेबांच्या डोक्यात त्यावेळी चर्चिला जात होता. देहानें आता ते थकून गेले होते. वस्तुतः त्यांच्या अफाट बुद्धीमत्तेला विस्मयात टाकणारी घटना विधात्यालाहि निर्माण करिता येणे अशक्य झाले असते.

सवाई माधवारावांबद्दल ज्या अपेक्षा नानासाहेबांनीं आपल्या मनातल्या मनात केल्या होत्या त्या ते जिवंत असतानाच विफल झाल्या होत्या.

आपल्या बापाचा खून करणाऱ्याच्या मुलाशीं...बाजिरावाशी श्रीमंतांनी अलिकडे नानासाहेबांच्या नकळत पत्रव्यवहार सुरू केला होता.

आणि याबद्दल नानासाहेबांनीं पुराव्यानिशी त्यांना जाब विचारला तेव्हां भ्रमाच्या भोवऱ्यात सापडलेले श्रीमंत म्हणाले, "आमची वेळ आता झाली. आम्हीं इंद्राचे ऐश्वर्य उपभोगिले. आम्हांस आता राज्याची इच्छा नाहीं; आम्ही आता सूर्यमंडळ भेदून जाणार."

यावर नानासाहेब त्यांना दुययार्शी धरून म्हणाले होते,

" हे असें बोलावयाचे होते तर मला या पूर्वीच काशीला जाऊ द्यावयाचे होते. पाटीलबाबाची हौस तरी भागविली असती. "

यावर श्रीमंत नुसते हंसले होते.

गेले कांहीं दिवस श्रीमंतांनी चित्तातला ताल सोडला होता.

पंधरा दिवसापूर्वीच त्यांनी वाड्यांत वाघनखानें कुस्ती करणाऱ्या शिंदे आडनांवाच्या पोराना आपल्या हौसेसाठीं आणि समाधानासाठीं इतकें लढवले कीं रक्तपात झाल्यामुळें अंग जागोजागी उसऊन गेलेली ती मुलें मलमपट्या वैद्याकडून चिकटविल्या जात असतानांच मरण पावली.

पर्वतीच्या रमण्यात महिन्यापूर्वी बोथाटीचा खेळ खेळतांना त्यांनीं नानासाहेबांची पगडी उडविली होती. आणि, आणि ते हंसले होते.

आणि आपली पडलेली पगडी उचलून घेत घेत नानासाहेब त्यांना म्हणाले होते कीं " श्रीमंत माझी पगडी पडली तर आपल्या डोक्यावरलीहि स्थिर राहील कीं. नाहीं याबद्दल शंका आहे. "

तात्पर्य, हें असें चालले होते—

श्रीमंतानी त्याचे तोंडही पाहू नये अशी नानासाहेबांची इच्छा होती. त्या बाजिरावाच्या आणि श्रीमंताच्या क्षेम खुशालीच्या चिठ्याचपाट्या चालल्या होत्या.

जुन्नरास कैदेत ठेवलेल्या बाजिरावाने श्रीमंताना चोरून पाठविलेली पत्रें शब्द लाघवानीं ओतप्रत भरलेली असत.

आणि कैदेत असलेल्या बाजिरावाला मग श्रीमंतानी हत्ती, घोडे, पालख्या, स्वार, शिपाई दासदासी वगैरे शागीर्दपेशाचा सरंजाम बहाल केला.

या साऱ्या गोष्टींचा विचार करून झाल्यानंतरसुद्धा श्रीमंताच्या मरणानें नानासाहेब दुःखी कष्टी झाले.

देवदर्शन घेऊन ते परत पायऱ्या उतरून खाली येऊ लागले. पायऱ्या उतरता उतरता बरोबर असलेल्या सरकारकुनाला ते म्हणाले,

" शिंदे, होळकर, भोसले, पटवर्धन, रास्ते यांच्याकडे सांड-णीस्वार पाठऊन त्याना त्वरेनें बोलाऊन घ्या. "



आणि पुण्यास नानासाहेबांच्या खलबतखान्यांत—

पटवर्धनापैकीं परशुरामभाऊ, होळकर, शिंद्यांचे दिवाण बाळा-बातात्या आणि जिवबादादा हे सारे एकत्र जमले.

बराच वेळ भवती न् भवती झाली

श्रीमंताच्या कुटुंबाच्या... यशोदा बाईच्या मांडीवर गोत्रजा-कीप कोणीतरी दत्तक देऊन राज्याचा कारभारापुढें सुरू ठेवावा असे ठरविण्यांत आले. मग नानासाहेबांनी आपली खास माणसे हुशार मुलाच्या संशोधनासाठीं गावोगावी पाठविली.

आणि तिकडे बाजिराव !

त्यानें पुण्यातील ब्राम्हणांना दक्षणा वाटावयास आरंभ केला. मी गादीवर आल्यास प्रत्येक ब्राम्हणास तीन मजली वाडा बाधून द्यावयाची माझी इच्छा आहे असे त्यानें बोलावयास आरंभ केला.

आणि बुभुक्षित आत्म्यावर त्याचा परिणाम असा झाला कीं ते आत्मे उघड उघड या ' दत्तक ' कल्पनेविरुद्ध बोलावयास लागले.

आपल्या धाकट्या भावाचा, अमृतरावाचा मेव्हणा शिंद्यांच्या लष्करांत होता हे त्याला ठाऊक होते. महाराष्ट्राच्या राजकारणात शिंद्यांचा पानाचा पक्का आपल्या हातात असावा असे बाजिरावानें मोठ्या विचाराती ठरविलें. त्या मेव्हण्याकरवी वशिला लाऊन शिंद्यांचे दिवाण सदाशिव मल्हार यांस त्यानें जुन्नरास बोलाविले.

कानाला ओठ लागले.—

हलक्या आवाजांत बातचीत झाली. ' सव्वाकोट रुपये रोख आणि पन्नास लक्षाची नवी जहागीर ' या ' देण्या'वर शिंद्यानी बाजि-रावाला गादीवर बसवावयाचे वचन दिले.

मग निवडून आणलेल्या मुलाच्याबद्दल नानासाहेबानीं त्यांचे मत विचारले कीं शिंद्याचे पुण्यातले वकील उत्तर द्यावयाची टाळा-टाळ करू लागले.

...मग नानासाहेबाना निजामाचेहि उत्तर आले कीं...

"–शिंदे ' दुसरी 'कडचे होतात...आणि तुमच्या घरांत ही असली कारस्थानें घाटत असताना तुम्ही जागे होत नाहीं. "

दुःखाने आधींच दडपल्या गेलेल्या नानासाहेबांच्या दुःखाला यावेळी असह्य वेदना झाल्या.

मग नानासाहेबानी पुन्हा एक वेगळाच डाव टाकला.

त्यानी पुण्याला बोलाऊन आणलेल्या साऱ्याच मुलांना परत पाठऊन दिले आणि बाजिरावाचा धाकटा भाऊ चिमाजी अप्पा याला दत्तक घ्यावयाचा विचार केला.

आणि शिंद्याच्या जेरबंद छावणीत आश्रयाला गेलेल्या चिमा-जीला पुण्यास घेऊन यावयाची कामगिरी त्यांनी परशुराम भाऊंना सांगितली.

त्याना निरोप देतांना नानासाहेब म्हणाले,

" कृष्णाजी आणि कान्होजी या दोघांना मी चिठ्ठी दिली आहे ती घ्या. ते दोघे आणि तुम्ही असे तिघे मनावर घेऊन पंच हत्यारी झालात तर तुमच्या मार्गाने अडथळा आणेल अशी नदी नाहीं, असा पर्वत नाहीं, असा कोट किल्ला नाहीं. "

आणि मग भाऊ हंसले.

आणि मग भाऊंचा पंचकल्याणी घोडा जमीनीवरली धूळ दिगंतात मिसळूं लागला.

चिमणाजी माधवराव असे नांव लाऊन ज्याला सिंहासनावर बसावयाचें त्याला आणावयासाठीं परशुरामभाऊ निघाले तें बरोबर निवडक सरंजाम घेऊन निघाले.

त्यांच्या स्वतःच्या फौजेला तर त्यांनीं बरोबर घेतलेच होते परंतु याशिवाय तीन हजार गारदी, दोन बाणांच्या कैच्या, दोन लहान तोफा, रास्ते आणि पंतप्रतिनिधी यांची पथकेही त्यांच्या सन्निध होतीं.

शिंद्याचे लोक जुन्नरास येऊन बाजिरावाच्या भोंवती संरक्षणाचा कोटाकिल्ला करीतोपर्यंत भाऊंना आपल्या हालचाली करावयाच्या होत्या!

त्यांच्या घोड्याच्या टापा बाजीरावाच्या दाराशी खडखडतात खडखडतात तोंच पुण्याहून नानासाहेबांनी मुद्दाम भाऊंच्या मदतीला धाडलेले बाहिरोपंत मेहेंदळे आणि हरिपंत पिंगळे तेथें येऊन पोंचले...

परंतु... ?

या साऱ्यांच्या आधी बाजीरावाकडे शिंद्यांचे खास वकील रामजी पाटील तेथें येऊन पोंचले होते.

आणि त्या मुलाखतीतच भाऊसाहेबांना कळून आले कीं आपण ज्या प्रकरणात हात घातला आहे ते जितके वाटले होते तेवढें सोपे नाहीं.

बाजीराव त्या भेटीत भाऊंना म्हणाला "मी आप्पास तुमच्याकडे देणार नाहीं. तो माझा धाकटा भाऊ. थोरल्या भावाला धतुरा दाखऊन धाकट्याला अंबारीत चढवावयाचा नसता जंग नानासाहेब कां बांधतात हें आम्हाला कळत नाहीं. एकतर मला कांहीं खूळ लागलें नाहीं. आणि लागलेले होते त्यालाही घेऊन नानासाहेबानीं राज्य राखलेच कीं नाहीं कालपावेतो! मला मुख्यस्थानीं बसवावयाचे असले तर बसवा नाहींतर आम्हा बाहेरचा कोणी दत्तक आणावयाचें ठरवा. हें न पटलें तर दुसरे कांहीं करा. चिमाजीला गादी देऊन मला त्याची

दिवाणगिरी देऊ म्हणता तेही मी वडील म्हणून मला मानहानीकारक वाटते. आणि तुम्ही म्हणता मी 'बाजिराव माधव' होऊन गादीवर येऊ तर तसेही मी करणार नाही. दुसऱ्याच्या ओटीत जाऊन पडावयाचे ब्रीद माझे नव्हे. तुमच्या नानासाहेबाचा वंश खुंटला त्याला आम्ही काय करावे ? मलाच गादीवर बसवा आणि बसवणार असलात तर 'बाजिराव रघुनाथ प्रधान' म्हणून बसवा."

बाजिरावाचे हे निश्चयाचे पहिल्या दिवशीचें बोलणें त्यानें पुढील दहा दिवसही असेंच चालू ठेविलें.

तो शिंद्याची वाट पहात होता. आणि ते तर अजून आले नव्हते.

अशी निराशा झाल्यानंतर ?

एके दिवशी एकांतात—

भाऊंच्या पायावर डोके टेकून हाताची अंजली बांधून बाजिराव म्हणाला,

मागील द्वेष तुम्ही मनांत आणू नये. मी आणणार नाही. वडिलाच्या जागी मी आता आपणास मानतो. माझा मनोदय आता या वेगळा नाही. मी आपल्या लेकरासारखा. धाकट्यास दौलत उपभोगावयास लाभावी आणि मी बंदीत दिवस कटावे हे आपणास रुचते काय ?"

आणि असे बोलत असतांना बाजिरावानें आपल्या डोळ्यातून पाणी काढले.

मग भाऊंच्या हृदयालाही अनुकंपेने कुरवाळले.

त्यांनी पुण्यास गोविंदराव पिंगळ्याना पाठविलें आणि झाल्या हकिकतीचे कानोसे नानासाहेबाच्या कानावर घालावयाची व्यवस्था केली.

इकडे शिंद्याच्या लष्करांतही काही आकस्मीक घडामोडी उत्पन्न झाल्या. जिवबादादा बक्षी हे जांबगावच्या वेशीवर अकस्मात मरण पावले. बाळोबातात्यांनी सर्व दुःख गिळून टाकून बक्षींच्या

मरणानंतर शिंद्यांची बाजू उचलून धरली. त्यावेळीं बाळोबातात्यांच्या हातातच उत्तरेकडली सारी सुत्रें होती. दौलतराव शिंदे हा केवळ हक्कदार होता.

बाळोबातात्या बराच फौजफाटा घेऊन पुण्याच्या रोखाने निघाल्याची बातमी नानासाहेबाच्या कानावर ज्या दिवशीं आहे. त्याचदिवशीं पिंगळेही भाऊकडील वर्तमान घेऊन पुण्यास आले.

मग नानासाहेबानीं ही वेळ पडते घेण्याची आहे असें ओळखून पिंगळ्यांना भाऊकडे तसा निरोप देऊन परत पाठविले.



त्याचे दुसरे दिवशीं रवि मावळता बाजीरावसाहेब मोठ्या लव्या जम्या-निशी पुण्याकडें यावयास निघाले

जुन्नरच्या दक्षिणेस बाराबावडीवर बाजिरावानें माघवद्य तृतीयेचा शुभमुहूर्त पाहून प्रस्थान ठेविले. बारावर्षांच्या चिमाजीसही संगती घेतलें कुटुंब आणि दुसरा भाऊ अमृतराव यास त्यानीं जुन्नरास ठेविले.

खडकीच्या दिशेनें बाजीराव चालू लागला. नानासाहेबांनीं त्याला बसावयासाठीं कलाबुतीची अंबारी पाठविली होती. बाजिरावाने आपल्या नेहमीच्या पूजेतील शंभुमहादेवाची मूर्ती पालखीत घालून बरोबर घेतली होती. सर्वांत पुढें ती पालखी चालत होती. त्यादिवशीं सूर्यास्त झाला! रवि मावळला!

दुसरे दिवशी चतुर्थीचा उपास म्हणून फार हालचाल झाली नाहीं, त्या दिवशीं रवि मावळता मावळतां बाजिराव अंबारीतून घोड्यावर उतरला आणि शिवनेरीचा किल्ला उजवा घालून शिवभवानीचे दर्शन घ्यावयास निघाला. नंतर श्रीपंचालिंगेश्वराचे दर्शन घेऊन तो कुकडी नदीच्या तीरावर येऊन संध्येस बसला. पुढें त्यानें 'लेण्याद्रीं' म्हणून गणपतीचे देऊळ होते त्याचे दर्शन घेतले. पुन्हा रवि मावळला!

नारायणगाव, खेड', चाकण, पर्यंत बाजिराव येऊन पोचला नानासाहेबाच्या काळजाचे लचके तोडीत तोडीत तो पुण्यास येत होता.

ज्या घराण्याकडे राजपद जाऊ नये म्हणून आजवर नाना-साहेबांनी, आपल्या साऱ्या हयातीला पणाला लावले त्या घराण्याला

आता ' आदब ' देऊन गादीवर बसवावयाचे त्यांच्या नशिबी आले होते.

चाकणच्या शिवेवर येताच पुण्याहून नानासाहेबानी पाठविलेली वस्त्रे, जवाहिर, कंठा, चौकडा, शिरपेच याचा अहेर बाजिरावाला करण्यांत आला. दोन भरजरी अब्दागिऱ्या नानासाहेबांनी आपल्या भावी ' धन्या 'साठीं पाठविल्या होत्या.

मोशीहून चौदा पंधरा घटकास कूच होऊन बाजीराव संध्याकाळीं रवि मावळावयाच्या वेळेला खडकी जवळ येऊन उतरला.

इंग्रजाचा पुण्यातील वकील मॅलेट यानें त्याच संध्याकाळीं बाजीरावांची गाठ घेतली.

त्या रात्रीं कलकत्त्याला पाठविलेल्या खलित्यांत मॅलेटने लिहिले,

"...गोड बोलणारा, दांभीक, लाघवी, भोळसर, आणि परमेश्वरावर आपला सारा भार टाकणारा असा हा बाजिराव आहे. आपल्या स्वार्थासाठीं वेळ आली तर सर्व पणाला लाऊन तो लढेल आणि; नानासाहेबांचा आणि त्याचा आज जरी वरवर मिलापा झालेला दिसतो तरी...

—एकंदरीत हे असें आहे. मराठ्याच्या राज्यावरला भाग्यसूर्य आतां मावळावयाच्या बेतात आहे."

---

—१३—

# ——आणि अमावास्या फुलली !

खडकीला उतरलेल्या बाजीरावाला भेटावयासाठीं नानासाहेब आपल्या लव्याजम्यानिशीं गेले होते.

आजवर एकमेकांच्या नाशासाठीं टपलेले हे दोघे...या दोघांची ती तसली पहिली भेट.

बाजीरावानें गादीवरून उठून त्यांना वंदन केले. त्यांच्याशी तो थोडेच बोलला परंतु त्यांतही त्याने जरब ठेविली होती. नानासाहेबांनी, "आज मुहूर्त चागला आहे, वाडयात प्रस्थान ठेवावें" असें म्हणताच बाजीरावानें 'आज आपली घाततिथी आहे' असे उत्तर हंसत हंसत दिले.

या उत्तरानें नानासाहेबाना काय कळावयाचे तें कळून चुकले. बाजीराव शिंदे यावयाची वाट पहात होता.

" आपण केव्हां यावयाचे ते आपणच ठरवावे...फक्त आधी खबर द्यावी म्हणजे लवाजम्याची तयारी करता येईल" नानासाहेब निरोप द्यावयासाठीं बैठकींवरून उठत उठत म्हणाले.

डेऱ्या बाहेरपर्यंत बाजीराव त्यांना पोंचवावयास आला.

"...असं पहा...झाले ते कृष्णार्पण झाले. आता मी परमेश्वर साक्ष सागतो कीं गतगोष्टीचा गिल्ला माझ्या मनी मानसी उरलेला नाहीं. यापुढें तुम्हींही सत्य स्मरून वागावे. मी तुम्हांस किंवा तुमच्या

देणार नाहीं. आणि कोणी दुसरा तसें करूं लागला तर त्याचे पारिपत्य करीन. तुमच्या कीर्तीस कलंक लागेल असे माझ्याकडून कांहीं होणार नाहीं. आणि जर तसें करण्यास कोणी आम्हांस प्रवृत्त करूं लागेल तर त्यांची खबर आम्ही तुम्हांस देऊं. तुमच्या सम्मतीशिवाय राज्यातील कैदी आम्हीं सोडणार नाहीं. जो काय राज्यकारभार करावयाचा तो तुम्हीं आम्हीं मिळून ठरवू. आजपासून तुम्हीं जे जें कराल तें आम्ही केले असे समजावे. आम्हीं आता तुमच्या बाबतींत निसंदेह आहोत."

यावर नानासाहेबांनी स्मित हास्य केलें.

नानासाहेब आपल्या वाड्याकडे परत आले तों दारातच कान्होजी आणि कृष्णाजी उभे होते.

त्यांना पहातांच नानासाहेबाना आश्चर्य वाटले. संधी मिळताच त्या दोघानीं नानासाहेबांजवळ आपले हृदय उघडें केलें.

"दौलतरावाच्या चाकरीतून आता आम्ही निघालो आहोत. तलवारीच्या तेजाला आता त्या चाकरीत चमकावयाला वाव नाहीं. शिवाय मुलाचे आणि मातोश्रींचे तंटे–खटके अखंड चालू. त्यांत आमच्या सारख्या जुन्यानी बाजू कोणाची घ्यावयाची ? तसें पाहिलें तर हेहि पाटीलबाबाचे आणि त्याही पाटीलबाबाच्या. तुमच्याकडे आलो ते येवढ्याचसाठीं कीं कांहीं देशाच्या सेवेसाठीं चंदनासारखे झिजण्यासारखे काम असले तर आमचे चार हात तुमच्या स्वाधीन करतो. तुमच्या खेरीज आज दौलतींत जाणतें नेणतें कोणी नाहीं."

यावर नानासाहेब त्यांच्याकडे कौतुकाने पहात म्हणाले,

"निराशा गराडू लागते आणि सर्वत्र अमावास्येचा अंधार फुलून गेला असे वाटते. आणि मग आम्ही विचार करूं लागतो कीं अस्तमानाला सारा पसारा आवरावा, संन्यास घ्यावा आणि बद्रिकेदारीनाथाच्या दिशेने वाट चालू लागावे..."

काहीं वेळ नानासाहेब स्वस्थ राहिले.

" परंतु...परंतु...तुम्हासारखी जुनी माणसे पुन्हा भेटतात आणि मग हृदय पुन्हा जबाब देऊं लागते. अजून कांहीं सारें सरलें नाहीं बाजीरावाला हातातल्या बाहुल्यासारखा ठेविला तर अजूनही राज्यरक्षणाची उमेद आहे माझ्या मनांत." नानासाहेब म्हणाले.

...परंतु " शिंदे तर कांहीं वेगळे बोलत होते." कृष्णाजी लगड म्हणाला.

" ते म्हणत होते कीं...!" कान्होजी जाधव म्हणाला.

मग नानासाहेब हंसले.



बाजिरावाकडे एक दिवस परशुरामभाऊ भोजनास गेले होते. वेळ रात्रीची होती. स्थान खडकीच.

पंक्तींत एकाने सहज विचारलें "आज भात कोणत्या तांदळाचा!"

त्यावर तो आचारी कांहीं उत्तर देणार तोंच श्रीमंतानींच तोंड उघडलें.

" पुण्याचा क्षय आणि पापाचा उत्कर्ष झाल्यामुळें वनस्पतींचें तेज गेलें."

या बोलण्यानें भाऊ गंभीर झाले.

बाजीराव शरीरसामर्थ्यानें चांगला होता. गोरा होता. नाक-डोळे बरे होते. स्नान संध्या करण्यातच त्याचा बराच काळ खर्च होत असे. एकादशी तो केवळ निरशनानें करी. देवाब्राह्मणावर त्याची निष्ठा फार होती. दानधर्मांत त्याचा हात सढळ होता. चिमाजीअप्पाजवळ हे सारे होते पण तो अम्मळ रागीट होता. चिमाजी बाजीरावाच्या धाकांतच असे.

जेवण चालूं असतांच पुन्हां बोलणीं सुरूं झाली.

"तुम्ही बंधु किती !" पटवर्धनापैकीं ' नारायण गंगाधराला ' बाजीरावानें विचारलें.

" चौथे ! " तो उत्तरला.

" मातोश्री आहेत ? " श्रीमंत ( ? )

" मातोश्री देवाधीन झाल्या. सापत्न माता आहेत "

" त्यांस काय मुले ? "

या प्रश्नास नारायणानें कांहीं उत्तर दिले नाहीं. मग पटवर्धनांपैकीं ' श्रीपतराव मोरेश्वर ' म्हणाले.

" अत्याची मुले नाहींत. अजून रजोदर्शनही झालें नाहीं. "

" त्यांस वर्षे किती ? " श्रीमंत

" सतरा वर्षें ! " श्रीपतराव.

" माझे मतें वीसबावीस वर्षे असतील. तथापि या वयातही मुलें होतील. " नंतर श्रीमंत विषय बदलून म्हणाले " गुदस्ता खर्ड्यांच्या लढाईत कामास आले तें विठ्ठलराव तुमचे कोण ? "

" आमचे चुलत चुलत बंधू " नारायणानें उत्तर दिले.

" सारी पटवर्धन मंडळीं किती होतील ? "

" तीस चाळीस असामी होईल ! " नारायण.

" यांत लहान थोर आली...? "

" तसे मोजमाप केले तर चाळीस पन्नास पुरुषच होतील. " नारायण म्हणाला.

" मोठे कुटुंब ! मोठे सरदार ! तुमच्याकडले हे सारे...पटवर्धन मंडळी, होळकर, शिंदे आहेत म्हणूनच राज्य क्षेम आहे. " श्रीमंत म्हणाले.

" परंतु याहूनही या साऱ्यामागे नानासाहेबांचे चातुर्य अधिक" नारायण म्हणाला.

" छेः छेः या तलवारी नसत्या तर नानासाहेबांच्या नुसत्या चातुर्यानें काय झाले असते ?...कांहीं झाले नसते. " श्रीमंत म्हणाले.

   

तिकडे बाळोबातात्याला हे चालू झालेलें राजकारण बिलकुल पसंत पडलें नाहीं. श्रीमंतास परस्पर नानासाहेब पुण्यीसें घेऊन गेले... आणि तसें श्रीमंत गेले म्हणून त्या दोघाच्यावरही बाळोबा रुसले. ते उद्गारले...

' नानांनींच हयातभर कारभार करावा असें काय म्हणून ? त्यांनीं फार केले आजवर. आता त्यांनीं सारे सोडून हरि "हरि" म्हणत घरीं बसावे. पेशवाईच्या खजिन्यांतील पैका जो कांहीं त्याज-पाशी असेल तो त्यानीं आम्हास फौजेचे खर्चाकरता द्यावा. शिवाय बाजीरावानें जे जे द्यावयाचे म्हणून ठरविले होते ते रुपये आणि मुलुख आमच्या स्वाधीन त्यानीं करावा. बऱ्या बोलानें नानासाहेबानीं केले नाहीं तर... ?

शिंद्यांच्या मोठ्या फौजेनिशी बाळोबा पुण्याकडे योवयास निघाला.

नानासाहेबांनीं मग आपल्या हालचाली करावयास सुरवात केली.

त्यानीं आपल्या 'मंडळींस' रायगडावर पाठऊन दिले. आपल्या पक्षातील मंडळीसही त्यांनीं बायका मुलांना आणि जडजो-खिमीच्या वस्तूंना नेऊन दूर ठेवा असे सुचविले.

आता आभाळावर आभाळें येऊं लागली होती. सूर्य आता असूनही नसल्यासारखा वाटत होता.

मग नानासाहेब पुन्हा बाजिरावाच्या भेटीला गेले. यापूर्वी शिंद्याच्याकडे त्यांनीं खुद्द बाजिरावाच्या हातचे पत्र पाठविले होते कीं, " येवढया सैन्यानिशी पुण्यास येऊ नका."

बाजिरावाकडे जाऊन नानासाहेब म्हणाले,

' आपले पत्रही पायदळीं तुडऊन शिंद्यांची अंबारी पुण्याच्या दिशेने झुलु लागली. त्याचे आमचे वाकडे पडले आहे. इथे आम्ही राहिलो तर परिणाम काहीं ठीक होणार नाहीं. काहीं दिवस मी साताऱ्यास जाऊन रहातो."

श्रीमंतानी प्रथम पुष्कळ आढेवेढे घेतले. परंतु मग त्यांनीं नानासाहेबाना त्याच्या मताप्रमाणें वागावयास सम्मती दिली.

बाळाबाना नानासाहेब पुण्याहून आपल्या हालचालीचे निमित्त दाखऊन हलतात असे कळताच अम्मळ अधिक अवसान आले.

त्यानें खासा स्वार पाठऊन नानासाहेबांना पत्र पाठविले.

त्या पत्रात—

"..... या आठ अटीवर आपण तुमच्याशीं तह करतो."

असें लिहिले.

नानासाहेबानीं तो लखोटा वाचला आणि फाडून टाकला.आणि त्याचे तुकडे त्या स्वाराबरोबर परत पाठऊन दिले.

बाळोबा म्हणजे शिंद्यांचा चाकर. आणि नानासाहेब म्हणजे पाटीलबाबासारख्याशीं तुल्यबलानें राजकारणाचे डाव खेळून जिंकलेले, थोर मुत्सद्दी.

परंतु काळ फिरला कीं परागंदा होणाऱ्या थोरावर परसातली कुत्रीही भुंकूं लागतात.

परंतु कुत्री भुंकू लागतात म्हणून कांहीं थोर परागदा होत नसतात...

केवळ शिंद्यांचे सैन्य येते एवढेंच काहीं निमित्त नानासाहेबाना दूर जावयास पुरले होते असे नव्हे.

खरें म्हटले तर 'राज्य' निखळू द्यावयाचे नाहीं म्हणूनच ते राया कारंजावर काळीज टाकून सूर्यमंडळ भेदून गेल्यानंतरच्या साऱ्या हालचाली करीत होते.

सुतकाचे दिवस लौकीक दृष्टया संपले होते तरी दुःखाचे दिवस कांहीं संपले नव्हते. बाजीरावाच्या पुढें उभे राहून त्याला 'मान' देऊन बोलावयाचे प्रसंग जेव्हा जेव्हा येत तेव्हां तेव्हा नानासाहेबांना पूर्वीचे सारे आठवे. आणि १"

मोठ्या मनःसंयमान ते क्रोधाश्रू आवरून ठेवीत; आणि हास्यमुख रहात.

आतां ते हंसत होते. परंतु त्या हास्यांत सुखाचा अरुणोदय नव्हता. ..

आतां ते चालत होते, परंतु त्यांत प्रगती नव्हती.

आतां ते बोलत होते परंतु त्यांत अर्थ नव्हता.

आतां ते राजकारण करीत होते परंतु त्यांत प्रेम नव्हते.

आता शनिवारवाड्यांत ते जात तेव्हां त्यांना तो भरलेला अबू-नही ओका ओका वाटे

एकदा त्यांना वाटले की या प्रचंड वाड्याला मशाल लावावी आणि...आपण आणि आपल्या बरोबरच्या जुन्या निष्ठावंतांनी बायकां-मुलांसकट त्या अग्नींत जोहाराच्या उड्या घ्याव्या...

• परंतु...!

त्यांची प्रखर बुद्धिमत्ता आशावादी होती.

आणि याच आशावादानें ते सतराशे शहाण्णवच्या मार्च महि-न्यांतील एकवीस तारखेस पुण्याहून कूच करून निघाले.

अवघे पांचसहा हजार स्वार त्यांच्या बरोबर जावयास त्यावेळीं तयार झाले.

दुसऱ्या दिवशीं ते पुरंदराच्या पायथ्यास जाऊन पोंचले. आणि पुढें सातारा....

त्याच दिवशीं पुण्यांत बाजिरावाच्या नांवाने चौघड्याचा हत्ती हिंडला. दौलतराव शिंद्यांचे स्वागत करतांना बाजीरावाने आजवरच्या साऱ्या मर्यादा सोडून टाकल्या.

आपल्या गळ्यांतील मोत्याचा–कंठा त्यांनीं दौलतरावाच्या गळ्यांत घातला. आपल्या पागोट्यातील फुलांचा तुरा त्यांनी त्यांच्या मस्तकी लावला.

"मला पेशवाई आपणच दिलीत; आपणास मी कधीही अंतर देणार नाहीं." बाजीराव त्याला म्हणाला.

मग शिंदे आपल्या गोटात गेले.

त्याच रात्री बाजिरावानें मोठ्या समारंभानें खडकीवरचे आपले प्रस्थान सोडले.

पुणे उजवे घालून भवानी पेठ, रविवार पेठ, यांमधून बुधवारच्या झेंड्याजवळ मोठ्या रस्त्यावर त्यांची मिरवणूक आली. सरकारचा वाडा उजवा घेऊन दिल्लीदरवाजाने तो आंत शिरला.

रस्त्यातून तो रुपये उधळत चालला होता. त्यामुळें गोरगरिबांचे त्याच्या बद्दलचे मत एकदम चांगले बनले.

वाड्यांत गेल्याबरोबर प्रथम त्यानें देवघराकडे जाऊन देवांना साष्टांग नमस्कार घातला. नंतर यशोदाबाईकडे जाऊन तो एक घटका बसला. मग थोरल्या चौकात बैठक मांडली होती त्या मसनदीवर तो तिला वंदन करून बसला.

मग तो म्हणाला,

"सवाई माधवरावांच्या राज्यारोहणाच्या वेळीं जेवढ्या तोफा डागिल्या तेवढ्याच आता डागा."

मग दरोग्यानीं साठ बार केले.

मग बाजीरावानें हजारो रुपये तेथें जमा झालेल्या ब्राम्हणांना वाटले.

दरबार संपला आणि ब्राह्मण घरांकडे परतूं लागले.

"राव राजबिंडे आहेत" '१' म्हणाला.

"कर्णाचे अवतार!" '२' म्हणाला.

"शंकर भक्त" '३' म्हणाला.

"आतां धर्म बुडणार नाहीं" '४' म्हणाला.

   

त्या ब्राह्मणांच्या पलिकडल्याच बाजूला एक शहाणा माणूस चालला होता.

तो पुटपुटला.

"आतां धर्म राहील परंतु राज्य जाईल!"

---

—१४—

# घरानंतर फिरलेलें वासे

" शिंदे सरकार तुमच्याकडे भेटीला रात्री येणार आहेत ! " खासगीवाले बाजीरावाला सांगत होते.

" परंतु आजरात्री आम्ही पर्वतीला जाणार होतो, " बाजीराव म्हणाले.

"तसे मी त्यांना कळविले परंतु त्यांचा पुन्हा निरोप आला आहे कीं काम महत्त्वाचे असल्यामुळें शिंद्यांना भेटीची वेळ बदलावयास सवड नाहीं. " खासगीवाले म्हणाले.

" मग आज आम्ही पर्वतीस जात नाहीं." बाजीराव म्हणाला.

आणि मग आपल्या मोठ्या लव्याजम्यानिशी दौलतराव शिंदे त्याच्या भेटीला आले.

आरंभीचे ख्यालीखुशालीचे बोलणें संपल्यावर घटकेची फुरसत न देता दौलतरावांनी मुद्याला हात घातला.

" आमच्या पैशाचे काय ! " दौलतरावांनी बाजीरावाला सवाल टाकला.

यावर बाजीराव स्मित हास्यपूर्वक शिंद्याच्या पुढें विड्याचे तबक ठेवीत म्हणाला,

" हे पहा दौलतराव, तुमचा आमचा जो करार झाला होता तो आता रद्द झाला. करारापमाणें तुम्ही कुठे वागलात ! तुम्ही जुन्नरास येऊन आम्हांस इथे आणून गादीवर बसवावें असें ठरलें होतें...ते

तुम्ही आलात कुठे? परशुरामभाऊ तेथें आल्यानंतर देखील आम्ही आठ दिवस त्यांच्याशीं तुम्ही याल या अंदाजाने सैल जाबसाल करीत राहिलो. तरी तुमच्याकडून तेथें येणें झाले नाहीं. ती हयगय झाली म्हणून सोडून दिली. इथें आम्ही आलो आज आठ दिवस झाले तेव्हा तरी तुम्ही कुठें हजर होतात ? ''

दौलतरावांच्या डोळ्यांत निखारा फुलू लागला. तो अंगार धोरणी बाजीरावालाहि दिसला.

" हे पहा दौलतराव, झाले ते झाले. करार तुम्ही मोडला. उशिरा आलात...सारे झाल्यावर आलांत तरीं तुमच्या सैन्याच्या येण्याजाण्याचा खर्च मला द्यावयाला हवा येवढें मला समजते. आणि तशी माझी इच्छाही आहे. '' बाजीराव म्हणाले.

दौलतरावांचा राग किंचित कमी झाला. •

"...परंतु;" बाजीराव पुढें बोलूं लागला.

दौलतरावांच्या भिवया कपाळांत घुसल्या.

"...परंतु नानासाहेब इथे नाहींत आणि जामदारखान्यांत तर एक पैसाही नाहीं. नानासाहेबास कारभारातून काढावयाचा हेका तुम्ही सोडून दिला तर सारे जमेल. नानासाहेबानी मनावर घेतले तर शहरच्या प्रत्येक घरांतून हजारो रुपयाचे तोडे चावडीवर आपखुषीनें हजर होतील. तुम्ही नानासाहेबाशी मिलाफ करा कीं मी तुमचे काम करतो !

बाजीराव कसा आहे हे शिंद्यांना त्या घटकेला कळले. परंतु आपल्याला ते कळले आहे याची जाणीव प्रकटपणें न देता त्यानीं हंसतमुखानें बाजीरावाचा निरोप घेतला.

" साताऱ्यास महाराजांकडून पेशवाईची अधिकाराची वस्त्रें घ्यावयासाठीं जाण्याकरितां आम्ही शनिवारी येथून प्रयाण करणार. तुम्ही व होळकर बरोबरीने असावे असे आम्हास वाटते. परंतु होळकर

अर्धांगाने आजारी आता तुम्ही तरी असावे.'' बाजीराव त्यांना निरोप देता देता म्हणाला.

"बरें आहे !" शिंदे उत्तरले.



...आणि थेऊरला बाजीरावाने आपला पहिला मुक्काम ठेविला. सातारकडे तो निघाला होता. पटवर्धनांकडली चार हजार फौज हा त्यचा सरंजाम होता. स्वारीबरोबर त्याशिवाय मानकरी, सरदार, होते. परंतु बाजिरावाच्या बरोबर त्याच्या स्वतःची अशी विश्वास ठेवण्यालायक राघोबादादाच्या वेळेपासूनचीं कांहीं मंडळी होतीच. त्यात बर्वे आणि केसोकृष्ण हे प्रमुख होते.

श्रीमंत कसे आहेत हे कळल्यापासून दौलतरावाचे कारभारी बाळोबा आणि परशुरामभाऊ यांचीं खासगी बोलणी होऊं लागली.

आणि एकेदिवशी थेऊरच्या गणपतीच्या देवळांत......

बाळोबातात्या, सदाशीव मल्हार दिवाण, धोंडो रामचंद्र, परशुरामभाऊ यांनीं शपथा घेतल्या...

"इतःउपर राज्यकारभारासंबंधाने ज्या ज्या मसलती करावयाच्या त्या सर्वांनुमते करावयाच्या."

हा शपथविधी अत्यंत गुप्त रितीनें झाला, त्यामुळें बर्वे, केसोकृष्ण, किंवा मानाजी काकडे यांना त्यांतले कांहींच कळलें नाहीं.

यानंतर पुन्हां भाऊंच्या आणि शिंद्याच्या गुप्तभेटी अनेकदा झाल्या. आणि या अनेक भेटीतून असे ठरले कीं...!

चिमाजी अप्पास यशोदाबाईच्या मांडीवर दत्तक द्यावे, बाजीरावाला शिंद्यानी आपल्या कैदेत ठेवावे. अल्पवयी पेशव्याचे कारभारीपण परशुरामभाऊनें पतकरावें. शिंद्यानी आणि भाऊंनीं पेशवा ताब्यांत ठेऊन सर्व राज्यकारभार पुढें एकदिलानें एकमेकाला मदत करीत चालवावयाचा.

हे ठरले आणि त्याच्या दुसऱ्याच दिवशी बाजीरावाला दौलत-राव शिंद्यांनी आपली ओळख दिली.

दिवस पाडव्याचा होता, बाजीराव सातारकडे जावयासाठी मुक्काम हालवावयाच्या तयारीत होता.

येवढ्यांत दौलतराव डेऱ्यांत दाखल झाले. त्यांच्याबरोबर त्यांची खाशी खाशी मंडळी होती.

" चलता ना सातारला ? " श्रीमंत म्हणाले.

यावर दौलतराव कांहींच बोलले नाहींत.

"...शिंदे आज आपला हिसाब पुरा करून घ्यावयाला इथे आले आहेत. " बाळोबा म्हणाले.

" होय ! माझ्या रकमेचा फडशा करा आणि मग आपण इथून आपले डेरे सातारसाठीं हलवा. " दौलतराव म्हणाले.

" तुमचा हिशोब कांहीं दहावीस लाखाचा नाहीं. कोटी दीड कोटीच्या सवालाना मी या क्षेत्राच्या ठिकाणीं काय उत्तर देणार ?" बाजीराव बोलला.

" ते आम्हालाही कळते. " बाळोबा म्हणाले.

" कळते म्हणता मग रस्ता कसा रोखता माझा " बाजीराव म्हणाला.

" श्रीमंत ! कांहीं झाले तरी तुम्ही आमचे मालक आहात. तुम्ही हूल दाखऊन गेलात तर तुमचे आम्ही काय करणार ! तुम्ही जामीन द्या म्हणजे आम्ही हाकाटी करीत नाहीं" दौलतराव म्हणाले.

" आणि तो जामीन कोणा लुंग्यासुंग्याचा असेल तर आम्ही पत्करणार नाहीं. " बाळोबा म्हणाले.

" होय, नाहींतर तुम्ही मानाजी काकडा किंवा केसोकृष्ण किंवा बर्वे पुढे आणून ठेवाल आमच्या. आम्हाला जामीन थोर असामीचा हवा. " दौलतराव म्हणाले.

"स्पष्टच सांगतो, परशुरामभाऊ खेरीज आम्हीं दुसऱ्या कोणाचाच जामीन पत्करणार नाहीं." बाळोबा म्हणाले.

मग बाजीरावानें भाऊंना बोलावले! बराच वेळ मग चर्चा झाली. मग भाऊंनी (पूर्वी ठरल्याप्रमाणे) बाजिरावाच्या देखत शिंद्यांना सांगितले कीं,

श्रीगजाननाची शपथ घेऊन सांगतो कीं श्रीमंतांनी तुमच्या कलमाचा फडशा केल्याचे तुम्ही खुद्द येऊन सांगेतोपर्यंत मी श्रीमंतांना सातारला वस्त्रे आणावयासाठीं जाऊ देणार नाहीं, या बाबतींतली सारी जोखीम माझ्यावर आहे."

हे सारे नाटक झाल्यावर शिंदे निघून गेले. आणि...

पाडव्याच्या त्या शुभदिवशीं बाजिरावाला कळून चुकले कीं प्रेमाची जी नाती चांदीनें जुळली जातात ती सोन्याने तुटतात.

त्या पाडव्याला बाजिराव शिंद्यांचा कैदी झाला असे म्हटले तरी चालेल.

त्या दिवसापासून 'भाऊ' त्याचे 'रखवाल'दार झाले.

आणि त्या दिवसापासून त्याचे गति स्वातंत्र्य नष्ट झाले.



दौलतराव शिंद्यांशी हात मिळवणी करण्यांत परशुरामभाऊनें आपल्यासाठीं 'कारभारी'पणाचे मोठे पद मिळविण्याचा हेतु सिद्धीस नेला होता.

'कारभारी' ही जागा नानासाहेबांची होती. आणि नानासाहेबांच्या गैरहजेरीत त्याची बाजू घेऊन शिंद्याशी बोलणें करावयाची सोय उरली नाहीं असे अनुभवास येताच परशुरामभाऊनें हे पाऊल टाकले.

थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे नानासाहेबाचे राजकारणातले जिद्दीचे दिवस आतां सरले असा तर्क करूनच भाऊ या प्रकरणांत प्रवेश करून स्वार्थ साधू लागले.

घर फिरले म्हणजे घराचे वासेहि फिरतात हेंच खरे !

नानासाहेबांच्या कानावर वरील साऱ्या गोष्टी गेल्या तेव्हां...



शिंदे परशुरामभाऊ याचे ठरल्याप्रमाणें शिंद्यानी एक दिवस पुन्हां बाजिरावाच्या दाराशी निकडीचे धरणे बसवले. स्वतः दौलतराव या मंडळीत नव्हते परंतु बाळोबा आणि त्याशिवाय आठ हजार कंगणी पगडीचा उडता घोडा घेऊन जिवाजी बक्षी आले होते. शिवाय या 'तगाद्या'ला तत्पता यावी म्हणून फ्रेंच अम्मलदारानीं तयार केलेल्या काहीं कवाईती फलटणीही बाळोबानीं नजीक ठेविल्या होत्या.

तगाद्याच्या हेतूने बाजिरावाला गराडून प्रकटपणें केद करून टाकावयाचाच त्याचा विचार होता

परंतु श्रीमंताबरोबरही त्यावेळी कांही नागवी खड्गे त्यांच्याकडे खाल्लेल्या निमकाला जागणारी होती.

रक्तपात होऊन बाजिरावाला कैद करण्यात मतलब नव्हता. मग शिंद्याकडली माणसें जाताना बाजीरावाला अद्वातद्वा बोलून गेली.

वास्तवीक या वेळी बाजिरावानेंच रागवावयाचे. परंतु त्याने निराळेंच बोलणें काढलें.

शिंद्याची मंडळी शिव्यागाळी करून आपल्या गोटात निघून जाऊन कांहीं वेळ झाला नसेल तो...

" हे पहा भाऊ " श्रीमंत भाऊंना म्हणाले " ती मंडळी कांहींही बोलून गेली तरी ती लहान आहेत. ती गेली ती काही संतोषाने गेली नाहींत. त्याचा रुसवा अजून ठिकाणावरच आहे. तो काढावयास आताच्या आता जावयास हवे. "

आपण पुढें व्हावे. आज मला प्रदोष आहे, आतां सायंकाळ झाली आहे. स्नान, पूजा, भोजन आटपून मी मागाहून येतो. " भाऊंनी नम्रभावाने सांगितले.

मग पांडुरंग बारामतीकर, गोविंदा बर्वे, अप्पाजी सहस्त्रबुद्धे, बाबाजी पटवर्धन, नानाजी काकडे, हिरोजी पाटणकर, मालोजी, घोरपडे, रघुनाथ पटवर्धन येवढी मंडळी घेऊन बाजीराव शिंद्यांच्या गोटात गेले.

शिंद्याकडील मंडळींनीं त्यांना तोफा झाडून सलामी दिली. आणि मोठ्या सन्मानानें डेऱ्यात नेले. चार घटका उभयपक्षी दोघांचे प्रेमाचे बोलणें झाले.

दोन घटका सरल्या होत्या. आतां मंडळी बोलण्याच्या रंगात आली होती. इतक्यांत एक घोडेस्वार दौडत दौडत डेऱ्याच्या दारापाशी आला.

" घात झाला ! घात झाला ! " तो ओरडला

" अरे काय झाले ! " असे सारी मंडळी आश्चर्यचकित होऊन त्याला विचारतात तों...

"...परशुरामभाऊ चिमाजी आप्पाला घेऊन पळून गेले. "

✦ ✦ ✦ ✦

नानासाहेबाना बाजूला टाकून भाऊसाहेबानी आपल्या ललाटाच्या रेषा उजळ करण्याकरता जे हे ' चिमणी 'ला ' पेशवाई 'चा घास भरवावयाचे प्रयत्न केले त्यांत आता उत्तम यश येत चालले होते. पुण्याहून आपल्या मोठ्या वाड्यातून आज ते आपल्या घरच्या मंडळींना पत्र लिहीत बसले होते. जुन्नरी घडीच्या कागदावर सोन्याचा वर्ख लावलेला बोरू चमकदार काळ्या शाईला सांडीत होता.

॥ श्री गणपती ॥

चिरंजिव राजश्री बळवंतराव व रामचंद्रपंत प्रति परशुराम रामचंद्र, आशिर्वाद उपरी. छ. ७ जिल्काद रविवारीं होळकराचे डेऱ्यास गेलो होतो, राजश्री बाळोबा पागनीस आले होते. निरोपाचे वेळी आम्हास शिरपेच व कंठी दिली. आज इंदुवारी दौलत-

राव शिंदे सरकारच्या वाड्यात आले. श्री. श्रीमंत चिमाजीरावांजवळ बैठक दीडघटका झाली. मग श्रीमंत मातुश्री बाईसाहेबाकडे गेले. नंतर सेवाधर्माची बोलणी झाली. 'केला कारभार शेवटास नेतो यात चलबिचल नाहीं.' असे खातरजमेचे बोलून बाईसाहेबाच्या पायावर हात ठेविला. उपरांतिक विडे देऊन निघाले ते आमच्या घरास आले. खुद्दास वस्त्र शिरपेच व कंठी हजीण दिली. बाळोबा पागनीसाना शिरपेंच व वस्त्रें दिली, बाजिराव बंदोबस्तात येऊरलाच ठेविले आहेत. दत्तविधान सातारोजात होईल. श्रीमंत नानासाहेब वाईस गेले आहेत. त्यास त्यानीं तेथे राहू नये असे शिंद्याचे मत. त्यांनी टोक्यास राहुन उत्तरपंथाची वाट पहावी असे दौलतराव बोलत होते. नानासाहेब सुखासुखी न ऐकतील तर शिंदे म्हणतात.......



नानासाहेब वाईचा निरोप घेऊन मंदवारि रायगडाकडे निघाले. घाटापासून महाडपर्यंत नानासाहेबानी स्वतःच्या चौक्या बसविल्या. दारूगोळ्याची जमवाजमव करू लागले. ज्याच्यासाठीं त्यानीं कित्येकदा आपली प्रतिष्ठा पणास लावली ते भाऊ आता शिंद्याच्या हाताला हात लाऊन त्यांना नाहींसे करू पहात होते.

...परंतु अस्तमानाला आलेला सूर्यही पौर्णिमेच्या चंद्रापेक्षा जास्त तेजस्वी असतो. प्रफुल्ल तेरड्यापेक्षा सुकलेली बकुळीची फुलेच वास देतात. धड कट्यारीपेक्षा खंडित खड्गाची धार अधिक कार्यक्षम असते. जिवंत लांडग्यापेक्षा हत्तीचे मढेही जास्त मौल्यवान असते.

महाडास पोचल्यानंतर नानासाहेबांनीं आपल्या विश्वासातल्या आणि प्रेमातल्या दोनतीनशे लोकांना ठेऊन घेऊन बाकीच्या सर्वांना निरोप दिला.

घाटातली अनेक झाडें तोडून टाकून घाटाची वाट बुजवावयाचे काम त्यानी कान्होजीला आणि कृष्णाजीला सांगितले.

ते काम करीत असतानांच एका कड्यावरून पाय घसरून ते दोघे खाली खोल दरीत पडले. आणि जवळच भुकेलेली वाघीण आपल्या पिलाला पाजीत होती...

मग नानासाहेबानी कलमदान हातात घेतले. ज्या लेखणीत दिल्लीला दहशत द्यावयाची सामर्थ्ये होती ती आता 'वारुळा'च्या किल्ल्याला सुरुंग लावावयासाठी 'कुरं' 'कुरं' करूं लागली.

—०—

—१५—

# सूर्यचंद्राच्या झांजा

रायगडावरल्या आपल्या मुक्कामाच्या ठिकाणीं प्रहररात्री उठून नानासाहेब देवापाशीं पूजा करीत बसले होते ऊद आणि धूप, कापूर आणि चंदन, केशर आणि कस्तुरी, चाफा आणि केवडा, गुलाबपाणी आणि खस यानीं त्या देवघरांतले वातावरण अगदीं ' मंद–धुंद ' करून टाकले होते. कमलिनीच्या आंत बिसतंतुशी बाताचित करीत भ्रमरानें बसावे तसे नानासाहेब आपल्या देवघरांत बसले होते.

कांहीं वेळ गेला, महिन्म स्तोत्र त्यांनीं पुरे करीत आणले. पुढें देवाच्या आरतीला सुरवात झाली.

' सुखकर्ता दुःखहर्ता 'ची वलयें कुणी मोदक हातात धरला होता त्यांच्या हाताला गुदगुल्या करून पुढे गेली; पुढें...

' लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा ' च्या आर्त हुंकाराने निर्माल्यांत सामील झालेल्या बिल्वदलाना नवतेजानें न्हाऊ घातलें. पुढें...

' धावरे रामराया 'च्या हांकेतील लाख कानामात्रांच्या पिसांनीं ते देवघर रामेश्वरावर नहावयास निघालें. पुढें...

' सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी 'च्या ललकारानें साऱ्या सुगंधी फुलांना शक्ति तेजाची अभ्यंगे घातलीं. पुढें...

' दुर्गेदुर्धट भारी ' नें देवीला संतोषविले.

त्यानंतर नानासाहेबांच्या प्रस्फुट अधरदलांतून ' ॐ यज्ञेन

यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि...ही मंत्र पुष्पांजली बाहेर पडली.

प्रसन्न चित्ताने नानासाहेब सोवळं सोडावयास उठले. त्यांचे सारे राजकारण आता सिध्द झालें होतें. आज तें पुण्याकडे जाणार होते.

" आणि त्याचे राजकारण येवढे यशस्वी रंगले कीं त्यांच्या विरुद्ध अद्वातद्वा बोलणाऱ्या ' बाळोबा'ला त्याच्या धन्यानेच म्हणजे दौलतराव शिंद्यानें मुसक्या बाधून अटकेत ठेविले आणि ' फिरलेल्या ब्राशा 'ला—परशुरामभाऊंना आपला आवडता चिमणा राजा पाठीवर बांधून एकाद्या ठक पेंढाऱ्याच्या घिसाड घाईत जुन्नरच्या दिशेने पळून जावे लागले.



पर्वतीच्या परिसरात नानासाहेब येऊन पोंचताच होळकर, शिंदे, मशिरमुलुक हे त्यांना सामोरे गेले.

परशुरामभाऊंचे ' पत्र ' घेऊन एक सरकारकून आले होते.

" आपला आमचा स्नेह पूर्वीपासून चालत होता. परंतु मध्यें धुके—धुराळा खूप खूप उधळला. स्नेहदीप मालवला गेला असेंही अप्रबुद्धांनी अंदाज केले. मध्यंतरीचा विपर्यास आतां आम्ही सोडला. पूर्वी ज्या प्रमाणें स्नेह होता त्याप्रमाणेंच पुढें आपण चालऊं. यांत अंतर आमचेकडून होईल तर श्री गजाननानें सारी अरिष्टे आमच्या माथ्यावर आदळावी. ही शपथ आणि तिच्या खात्रीच्या गजाननाच्या दुर्वा आमचा माणूस श्री वाडदेकर याचे बरोबर पाठविल्या आहेत."

पत्र वाचून नानासाहेब हंसले. आणि त्यानीं भाऊसाहेबांना निरोप दिला.

"...झाले ते होऊन गेले...जुन्या धुरळ्यांनी हात माखावयाची आमची वृत्ती नाहीं. आज तर तसे करावयास अवधीच नाहीं. आतां निर्धास्त असावें. आम्हांकडून कांहीं वैरभावाने होणार नाहीं. ईषारा होतांच घोडा पुण्याकडे आमच्या अंगुली निर्देशाकडे लक्ष देऊन वळवावा. मध्यंतरी वितुष्ट आलें ते कांहीं मासाचे. स्नेह होता तो जपातपांचा ! साऱ्या ' हिरव्या 'पणी आपण दिल दिलाशाने हात

हातीं बांधून राजकारण खेळलो ते आयुष्याच्या अस्तमानांतून वितुष्टाचे निखारे अस्तनींतून बाळगून अखेरची वाट चालवयाची काय ?"

सारे 'गेलेले' सारे फिरून मिळवित नानासाहेब पुण्यास येऊन दाखल झाले. पेशवाईचा दरारा ' आसेतु हिमाचल ' बसाविणाऱ्या नानासाहेबांना एक दोन सरदारांच्या आणि एका कारभाऱ्याच्या कारस्थानाचे कोळिष्टक पुण्याच्या शनिवार वाड्याच्या भिंतीवरुन झाडावयाला वेळ लागला नाहीं.

त्यांनीं पाहिले कीं हे कारस्थान केवळ पैशाच्या आशेनें एकत्र आलेल्या चार मंडळींच्या हातानें उभारले जात आहे.

मग त्यांनी स्वतःच्या तिजोरीचे दार उघडले, ते दार उघडताच थैल्याचीं तोंडें रिकामी झाली आणि आंतून रकमा बाहेर पडल्या.

आणि त्या रिकाम्या झालेल्या थैल्यात गारुड्याच्या पाळलेल्या मुंगसाप्रमाणें ' दौलतराव ' 'निझाम' त्याचा दिवाण: 'मशिद' उल्मुल्क म्हैसूरचा ' टिपू ' ' मॅलेट ' आणि बाजीराव येऊन बसले.

जे स्नेह चादीने जुळले जातात तें सोन्यानें तुटतात हे नानासाहेबांना ठाऊक होते.

परंतु हे राजकारण यशस्वी करून नानासाहेबांना कांहीं विशेष आनंद झाला नाहीं. पार्थाला कर्णाशीं लढतानाच आनंद होतो. उदयाचलावरल्या रविबिंबाला काजव्याच्या पळत्या कळ्याकडें पाहून समाधानाचे हांसू गालावर फुलवावेसें वाटत नाहीं.

शुभमुहूर्त पाहून नानासाहेबांनी थोराथोराचे मुजरे घेत परत वाड्यांत प्रस्थान ठेविले तरी त्याना कांहीं समाधान वाटलें नाहीं.

आबा शेलूकरांना साताऱ्यांस धाडून नानासाहेबांनी बाजीरावासाठीं वस्त्रें आणली. बाजीराव पेशवा, चिमाजी अप्पा, पेशव्यांचा दिवाण, नानासाहेब चिमाजी अप्पाचे नायब; अमृतराव—बक्षी, व फडकें अमृतरावाचा नायब, अशी व्यवस्था झाली.

नानासाहेबानी यानंतर बाजीरावाकडून बारा कलमे लिहून घेतली. त्याला राजहिताच्या गोष्टी सांगितल्या.

अमृतरावाचे आणि बाजिरावाचे तंटे विकोपास जाऊ नयेत यांसाठीं त्यांची समजूत नानासाहेबांनी काढली.

आलिबहाद्दरास पत्र लिहून त्यांनीं त्याचा व दौलतरावांचा तंटा कायमचा मिटऊन टाकला.

लहरी बाजीरावानें एकदा रुसून जानवे तोडून राख फासून साधु बनून पुण्याबाहेर पडावयाचे ठरविले त्याचीही समजूत नानासाबांनीं काढली.

कुरड्चा घाट नीट करून घेतला.

✦ ✦ ✦ ✦

काळ पुढें धावत होता. आणि नानासाहेबांचे प्रकृतीमान अधु-अधु होत चालले होते. पानपताचा वज्राघात सहन करूनही जो देह उभाच्या उभा राहिला होता तो आता वाकूं लागला होता. श्रीमंतांच्या मृत्युने पूर्वी हाय खाल्लेल्या हृदयाला आतां दौलतरावाच्या नित्याच्या कटकटी तापदायक वाटूं लागल्या.

नारायणरावाच्या रक्ताने रंगलेल्या गणपती महालांत बसून राघोबा-दादाच्या आणि आनंदीबाईच्या...बाजीरावांशी मसलतींचे बोलणें करताना मुखावर स्मित ठेवणें आतां त्याच्या अनेकदा ताणल्या गेलेल्या संयमालाही न झेपण्यासारखे वाटूं लागले.

...आणि बरोबरीची एकेक माणसें दूर...दूर...दूर... दिगंता पलीकडे गेलेली. ...

अशक्ततेमुळें नानासाहेब हल्ली बराचवेळ एकांतात घालऊ लागले. कालियामर्दनाची एक सुवर्णमूर्ती अगदी आलिकडे त्यानी तयार करून घेतली होती. तिचे ध्यान करीत ते तासन्तास बसत.

एक दिवस शिंद्यांच्या फलटणींनी त्यांच्या वाड्याभोवती गराडा घातला तरी त्यांना त्याचे कांहीं वाटले नाहीं.

एकदा स्वतःच्या सैन्यावरचा फिरंगी अधिकारी मि. गॉसन

कांहीं लोकांनी सुरे हाणून कापून टाकला तरी त्याच्या मनाची चल विचल झाली नाहीं.

पुढें समझोता करुन घेऊन शिंदे त्याच्याकडे आपणहून नमस्काराला आले, तरी ते हंसले नाहींत.

'हर्षखेद ते मावळले' अशी त्यांची स्थिती झाली होती. कांहीं करावे असे आतां वाटत नव्हते. आणि......

जुने वाद आतां शक्य तितके मिटवून टाकावयाचे अशा धोरणानें ते वागत होते. नगरच्या किल्यांत कैद करून ठेविलेल्या मोरोबा दादाला त्यानी शिरोळकराना पाठऊन पुण्यास आणविले.

पुन्हा मतभेद होऊन, बाजीराव त्याना राज्यकारभारांतून उठऊ लागला. तेंव्हां या कटकटी नकोत म्हणून 'मुकीर' आपणास कैद करणार आहे हें माहीत असूनही ते शिंद्यांच्या गोटात आपणहून गेले...

पुढें नानासाहेबांना नगरच्या किल्याच्या भिंतीची उंचीही कांहीं दिवस मोजावी लागली. परंतु त्याचेही त्याना काहीं वाटले नाहीं.

एकांतात त्याना त्या भिंतीवरून पूर्वी आपल्याबद्दल आतापर्यंत नाना लोकानी उच्चारलेली व लिहिलेली कौतुक वाक्ये पुन्हा ऐकूं येत.

हैदरखानाने म्हटले "तुम्ही इंग्रजांचा धाक आहात. आपली मिजास मजबूत आहे."

श्रीमंत माधवराव म्हणाले "आमचा विश्वास आपण आहांत. आळस तुम्हास नाहीं. आपले पुण्य आम्हांहून अधिक"

सखारामबापू म्हणाले "आपण जिकडे आहांत तिकडे फिकिरीला फिरकावयाला फुरसत लाभत नाहीं."

मुधोजी भोसले म्हणाले "..आपल्या स्तुतीचा वयाना आम्ही काय लिहावा? गुणाचे योग्य स्तवन करावयाला आकाशवाण्यांनाही अधिक सामर्थ्य जमवावयास हवे."

हरकुंवर म्हणाली, " दूरच्या इंदुरावरही आपला असर ! आपण मुखावाटे ' करून देतो ' म्हटले कीं न होण्याची बिशाद पृथ्वीतलावर नाहीं. "

अहिल्या देवी म्हणाली...' गांवे इनामे देऊन कागद पत्रें पाठविली तर आपण लिहिलेंत. बहिणीने भावासाठीं महेश्वरी बनावटीचा छानदार धोतर जोडा पाठवावा, त्यांत सर्व लाभले..."

नजफरखान बादशहा म्हणाला, "...दिल्लीलाही पुण्यातल्या तुमच्या अकलमंदीची अस्करा येऊन पोहोचली. आमची परवरदिगारला रोज प्रार्थना कीं आमच्या दौलतीस आपल्यासारखे कारभारी लाभावे."

बाळाजी शंकर म्हणाले, " पुणे दरबारचे पुण्य आपण आहांत. आपण नव्हता तर वाड्याचे बुरूज बारा ठिकाणीं फुटून तडे खाते. गंगाजळ निर्मळ देवीने आपणास गौरविलें तें यथायोग्यच. "

राघोबादादा म्हणाले " आपणासारखा विरुद्ध पक्षाला ठाकता तर भगवंतानाही विषण्णता येती. आपण होतात म्हणून जमीन आभाळाला भिडऊनही आम्ही कोरडे राहिलो.

गोपिकाबाई म्हणाली, " संकटकाळांत आत्मदुःखानें चौतर्फी दुःखाचे डेरे दिले तेव्हां आपणच आशा घेऊन राज्य राखले. आपण नसतात तर घराघरातल्या फिसादीनें राज्य फालतूंच्या हाती पडून खापरी झाले असते. "

जेम्स अँडरसन म्हणाले "..मस्तकावरली टोपी मानमुर्वत देण्यासाठीं आपखुशीने हातात घ्यावीसारखी वाटावी अशीच आपली चाल चलणूक..."

मॅलेट म्हणाला..."..न्यायी, काटेतोल भाषा, बुद्धीचें पेचपाच, मुखावरले तेज आपले कांहीं आगळेच. "

मॉशियर गाडर म्हणाले "...' आर्डर ऑफ सेंट लुई ' हे मानचिन्ह आपल्याला देतांना मला त्या चिन्हाचा गौरव केल्यासारखे वाटते. "

पाटीलबाबा म्हणाले ".. मांडला ते खरे, परंतु ध्यानीं धरावे कीं मागे बहुत झाले आणि पुढें उदंड येतील जातील परंतु आपण थोर ते थोरच रहाल."



मग नानासाहेबांना त्या किल्ल्यांतून सोडऊन पुन्हा मान सन्मानाने पुण्यास नेले. तेंव्हाही त्याना कांही विशेष आनंद वाटला नाहीं.

त्याना आतां कळून चुकले होते कीं आपण आता फार दिवसाचे सोबती नाहीं. आता ह्या देहाचा कपडा मरणाच्या घाटावर कृतांताचा परीट येऊन घेऊन जाणार आहे !

आता दिवसाला रात्र ग्रासूं लागली आहे. आतां सूर्यमंडळाभोंवताली जहाजातून आलेल्या गौरवर्णीय तांडेलानी गराडा घातलेला आहे.

मग ते निवांतात बसत आणि गुणगुणत...

गतसङ्गस्थ मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतस; । यज्ञाया ऽऽ चरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥

आणि कांहीं वेळानें आपल्या वाड्याच्या चंद्रशाळेवरून आळंदीच्या दिशेनें पाहूं लागत.



## —१६—

# आणि आतां....!

आज बेलबागेंत भगवान श्रीविष्णुसमोर नानासाहेबाचें कीर्तन होतें. अगदीं नजीकच्या लोकांसमोर ते उभे राहिले. त्यांचा देह आता थकला होता. अनेक उलाढाली केलेल्या आणि करणाऱ्या मेंदूचा न कंटाळता मागोवा घेऊन घेऊन ते 'साडेतीन' हात आता सांध्यासांध्यात वाजू लागले होते.

पूर्ण उमलल्यानंतर फूल पाकळी पाकळींनी गळू लागते. सवाई-माधवरावांच्या कारकीर्दींत नानांनी आपली कीर्ती, वैभव, संपन्नतेचे फूल पूर्ण उमललेलें पाहिले.

त्यानंतरचे त्यांचे आयुष्य पाहिले म्हणजे कारंज्यावर उसळ-लेल्या काळजातच नानांच्या कीर्तिसूर्यांच्याही खापऱ्या झाल्या असे म्हणावे लागते.

परंतु नाना निग्रही होते आणि विवेकी होते. जे घडत होते आणि घडले होते त्या सर्व बऱ्या वाईट प्रसंगीं त्यांनी आपली बुद्धी एकाद्या खेळाडूसारखी ठेविली होती.

जीवन हे एक नाटक आहे हें त्याना समजले होते. राम आले आणि गेले आणि पुढे कृष्ण आले आणि त्यांनाही जावे लागले.

अवतारांच्या परिसमाप्तीचा इतिहास त्यांना ज्ञात होता. अखंड प्रगत राहू इच्छिणाऱ्या सृष्टीला मरणाच्या पायाने वार्धक्याचा चिखल

तुडवीत तुडवतच नवीन मंदिरासाठीं सुंदर विटा निर्माण कराव्या लागतात !

नानासाहेबांना ठाऊक होतें कीं, जगांतली अखेरची ओवी पुनर्जन्माच्या अमृताची पैज जिंकणारी असते.

ज्या 'जाण्याला' परत 'येणे' नाहीं अशा जाण्याच्या पूर्वरंगाला चाळीशी नंतर प्रत्येक व्यक्तीला सुरवात करावी लागते.

आज नानासाहेबांनीं प्रथमारंभी सर्वांना वंदन करुन सांगीतले कीं

"जे आज इथें जमलेले आहेत ते सारे माझेच आहेत. जीवनात चालतांना सुद्धा चुकून माकून मुंगींवर पाऊल पडते. आतां पर्यंत राज्य राखण्याच्या मोठ्याफंदात अनेकाच्या बाबतींत कमिअधिकपणा आमच्या हातून झाला असणें अगदी शक्य आहे; परंतु या श्रीविष्णु समोर मी उच्चार करून अशा रितीनें कळत न कळत झालेल्या नुकसानीं बद्दल मी सर्वांची माफी मागतो. राज्यराखावायाचे म्हणून ज्यांच्या मळमळीं झाल्या त्याची दलदल आता आम्हाला नाहींशी करावयाची आहे.

या देवाच्या दारांत आतापर्यंत नमस्कार आणि मुजरे घेण्या-चीच सवय असलेले हे माझें माथे मी दहादिशाकडे न्याहाळित अवनत करतो. जे हात भल्याभल्यांशी ठीकठाक झुंज खेळत आले ते हात आतां मी अंजुली बांधण्यासाठीं एकत्र आणले आहेत.

आताच मी कीर्तनाला उभा राहिलो. माझ्या बेलबागेतल्या या श्री विष्णु समोर मी माझ्या पद्धतीने कीर्तन करून प्रभूचें गुणगान करणार आहे."

असे म्हणुन त्यांनी पूर्वरंगास आरंभ केला.

गळ्यातल्या वीणेवर पेशवाईची रियासत रंगविणारे बोट हळूवार-पणानें फिरू लागले.

आणि नानासाहेबांच्या अधरदलातून गोपाळ शाहीरानें विरचि-लेला एक तेजस्वी अभंग उदित होऊं लागला.

विश्वाचा वारकरी मी । सूर्यचंद्र अमुच्या झांजा !
रेशीम ध्वजाला देती । तिन्ही त्रिकाळच्या तिन्हिसांजा !

हा अभंग म्हणून झाल्यावर ते म्हणाले.

" आता मी आयुष्याचे अर्घ्यदान करावयास निघालेलो आहे. मनांत पूर्वी पुष्कळ होते आणि काही 'होते,' झाले काही 'नव्हते' झाले. परंतु मनांत होते ते मी फक्त एकाच व्यक्तीजवळ दिलखुलास करून आजवर बोललो. परंतु ती व्यक्ती आता विश्वेश्वराच्या उशागती जाऊन पोचलेली आहे. गोपाळ शाहीराला ओळखणारे इथे कोणी असेल असे मला वाटत नाही. कारण तो इतर शाहीराहून अगदी वेगळा होता. तो शिखरावरल्या कळसासारखा शाहीर होता. जगाच्या डोळ्याना कळस अंदाजानें मोजावयाची संवय असते आणि तो अंदाज 'विती दीडवितीचाच' असतो. वास्तवीक शिखर खूप मोठे असते. आपल्या लायकीमुळें ते सामान्याच्यापेक्षा उंच पातळीवर पोचलेले असते. गोपाळ शाहीराने आपल्या हृदयाच्या तातीवर लावण्या छेडल्या नाहीत किंवा इतिहासातले खरे पराक्रम खोट्याच्या नावनिशीवर नोंदणारे पोवाडेही छेडले नाहीत. त्यानें लिहिले.—

मानवतेचे आम्ही पुजारी
विश्वधर्म कैवारी ॥ धृ ॥
ज्ञानेश्वर तुकयांच्या चरणरजानें
समर्थांचिया जयनादानें
शिवरायाच्या पराक्रमानें
पावन केली पवित्र झाली त्या भूमीचे वारकरी ॥ १ ॥
प्रखरांतुनी तिमिरांतुनी
शतका शतकांच्या परिवर्तनी
पडलेल्या उल्कांना चढवितो असितांबरी ॥ २ ॥
राग मोह विद्वेष जाळतो

या विश्वाची पूजा कारितो
नंदादीपापरी अखंड जळतो तिमिरांतरी ॥ ३ ॥

असे त्यानें लिहिले. आणि जे त्यानें लिहिलें ते या नाना-साहेबांच्या मनातून भरलेले होते.

आता मी अधिक बोलत नाहीं. कीर्तनाला मी उभा आहे. आत्मनिष्ठ मला फार वेळ रहाता येणार नाहीं. आज मी "कृष्णावताराचे रहस्य" हे आख्यान घेणार आहे.

यानंतर नानासाहेबांनीं आपल्या उल्लेखनीय पद्धतीनें भगवंताच्या जीवनाचे विवरण केले.

आणि अगदी शेवटीं ते 'समातीं' जवळ येता येता म्हणाले,

" कृतांताच्या शिलेदारांचे शेमले आता माझ्या अधु झालेल्या डोळ्यांनाही दिसतील येवढ्या जवळ आलेले आहेत. राजकारणांत मी पडलो तेव्हां जगणें अनेकदा मला मरणाकडे तात्रेगहाण टाकावे लागले. विजयाची आशा असतांना पराभव मी पत्करले आणि पटा-वर, माझ्या बाजूला मी प्यादे आणि श्रीमंत राजे असे एकटेच उरलो असतानांही मी बुर्जी केलेली आहे. विधिलिखितावर माझा विश्वास आहे, आणि प्रयत्नावरही माझा विश्वास आहे. चंदनासारखे पराकारणी झिजत जावे आणि झिजना झिजता नाहींसे व्हावे असेंच माझ्या मनाचे ठेवें होते. आता मी झिजण्यासारखे दैवतही उरले नाहीं आणि दैवत नाहीं हेही ठीक आहे. कारण या देहकाष्ठाचा सुगंधही आता सैरावैरा झाला आहे.

तुळशीपत्राच्या सान्निध्यांत आता आम्ही आहोत. या तुळशि-पत्राच्या मंगल वातावरच विश्वाची विदग्ध वागिश्वरीं विवेचकांना वंदनीय वाटेल अशी कविता लिहायवयाला बसते.

या पवित्र पानावरूनच पुण्यवान पुरूषाचे पुण्य 'निजा'च्या 'निजा' पापणीवर ठेवीत इह लोकांतून परलोकाकडे जाते.

याच पवित्र पानावर भगवंताची गीता, ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी, समर्थांचा दासबोध, तुकारामाची अभंगमाला लिहिली गेली. मरणाच्या

मण्याला आतून कौतुकाची किनकाफ मढवलेली असते. आज झाले... आजवर झाले त्यापेक्षा या तुळशिपत्रावरून आम्ही दूर दूर दिगंतरांत जाऊ लागलो की अधिकांतले अधिक गौरव आम्हाला मिळतील.

आतां...

"आता आम्ही जातो अमुच्या गावा..." कीर्तन संपवून नानासाहेब मंडळींत येऊन बैठकीवर बसले. आणि घटकाभरात त्यांना मूर्च्छा आली.



अखेरच्या घटका मोजीत नानासाहेब आपल्या बिछान्यावर पडले होते. ते अत्यवस्थ आहेत हे साऱ्याना कळून चुकले होते. आतां अवघे पुणे एका अशुभकासाठी आपल्या हृदयाला दगड करण्याच्या उद्योगाला लागले होते.

उशागती बसलेल्या बाजीरावाला नानासाहेबानी ओळखले नाही. त्याच्या दुसऱ्या बाजुला बसलेल्या कर्नल थामरलाही नानानी ओळखले नाही.

नामांकित वैद्य आपल्या ज्ञानाला पणाला लाऊन सहाणेवर मात्रा घाशीत होते. आणि या गोलाकृती 'वळशा'ना समांतर अशा प्रदक्षिणा पुण्यवान लोक नानासाहेबाना आयुष्यलाभ व्हावा म्हणून देवळादेवळात घालत होते.

गावांतल्या प्रत्येक शिवमंदिरात अभिषेक सुरू होते....

आणि काही ठिकाणी पंचाक्षरीही 'लिंबे' कापीत होते...

परंतु नानासाहेबांच्या पापण्यांच्या परिघात आता, आता तुफान वेगानें एक दिव्यत्व पिंगा घालीत होते.

त्या दिव्यज्योतीच्या प्रकाशांत एका अजस्त्र पुरुषानें त्याना आपल्या स्कंधावर घेऊन मागे मागे पावलें टाकावयास सुरवात केली...

आता गुरवार तारीख तेरा मार्च अठराशे इसवी सन होता...

मागे चालता...चालता...

सतराशे बेचाळीस ..फेब्रुवारी ... बारा तारीख...स्थळ सातारा...रात्रीचे साडेदहा.

पाळण्याच्या परिसरांत इवले इवले हातपाय डोईवर टांगलेल्या कापडांच्या चिमण्यांशी काजळ फासलेले टपोरे डोळे लदकू लागले.

पुढे मुंज. आणि पुढें विवाह...१७५२ ...सातारातली एक मुलगी गद्र्यांच्या घरांतून निघाली आणि फडणविसाच्या घरात दडून बसली.

माणूस जन्माला येतो तो आई वडिलाचे आसरे घेऊन येतो. परंतु... !

दूर दूर·· वडिलानी उत्तर हिंदुस्थानांत आपले जीवन जनार्दनाच्या स्वाधीन केले. १७५६...

गालिचावर गंजिफांची गल्लत व्हावी तसे नानासाहेबाच्या डोळ्यासमोर सूर्य चंद्र सरमिसळलें जात होते.

उशागती एक नंदादीप तेवत होता. त्या नंदादीपाच्या स्थिर ज्योतिच्या सूक्ष्म टोकावर अहमदशहा अब्दाली उंटावरल्या डोजाला तोंफाना तोंडे लावीत होता. त्याच्या पलिकडल्या बाजूला भाऊंना 'आमरणात तुमचा' म्हणून वचन दिलेला इब्राहिमखान गारदी आपल्याला रणांतून पळावयाची बुद्धी झाली तरी पळता येऊ नये म्हणून आपले पाय तोफेच्या गाड्याशी कुलुप बंद करून घेऊन अखेरच्या घे घे मारीला उभा होता. त्याच्या उजव्या बाजूला शिंदे होते. होळकर होते, त्याच्या बरोबरच हैदरअल्ली आपल्या सबजारंगाच्या घोड्यावर बसून कोल्हापुरपासून तें तडक तंजावरपर्यंतच्या, मद्रासपर्यंतच्या मुलखाला चांदसिताऱ्याला कुर्निसात करावयास लावीत ससाण्याच्या गतीनें निघाला होता. त्याच कनकरंगी ज्योतीवर नानासाहेब होते. माधवराव होते. नारायणराव होते. सवाईराव होते. पाटीलबाबा होते.

उजवीकडून डावीकडे असे ते सारे कुठे तरी जात होते. अगाधांतून अज्ञाताकडे, चाललेले ते वाटेत त्या खोलीत येऊन क्षणभर

थांबले होते. आणि परत मार्गस्थ होतांना त्या युगायुगाच्या सहवा-सांत नानासाहेबांना आपल्या सोबतीला चला असे म्हणत होते.

त्या दिव्यज्योतीवर उत्तरेतले आणि दक्षिणेतील, पश्चीमेकडले आणि पूर्वेकडले मोठ्या मिनतवारीने पडऊन आणलेल्या तटाचे कागद हळूहळू कापरासारखे जळत होते. ते कागद जळत असताना त्यावरील कलमबारीची अक्षरें आपल्या कानामात्रांच्या हातापायांना रागाने आपटत होते.

त्याच ज्योतीवर नानासाहेबांची मोर्तब 'श्री शिवचरनलीन निरत जनार्दन सुत बाळाजी पंडीत' ही सत्वपरीक्षा करून घ्यावयासाठी जळत होती.

त्याच ज्योतीवर मुतालकीची शिक्के कट्यार तेजाला आपले दिव्यत्व पटऊन देत होती.

त्याच ज्योतीवर दिल्लीच्या वजीरीचे मिळालेले फडणविशी कलमदान आपल्या चांदीचा कस तपाशीत होते.

याच ज्योतीवर नानासाहेबानी गोदावरीवर बांधलेला घाट सापेक्षतेने उभा होता. त्या घाटाच्या खालच्या नदीमध्ये रघुनाथरावाच्या हाती दिलेली नानासाहेबाची कारभारीपणाची वस्त्रें भिजत पडलेली दिसत होती.

याच दिव्य शलाकेवर शनिवार वाड्याजवळच नानासाहेबांनी सुरू केलेले आपल्या वाड्याचे बांधकाम दिसत होते.

याच दिव्य ज्योतीवर पुणें, आंबेगाव, महाड, रायगड, वाई, बोरवण, खर्डे, बदामी, पंढरपूर, गंगापूर, कोकण, पुनवले, भोसेगांव, टोके, औरंगाबाद, ब्रम्हाणपूर, पुरंदर, कोपरगांव, भोसूर नानासाहेबांच्या पायांना आपापल्याकडे खेचून घेत असताना दिसत होते.

याच दिव्यत्वाच्या शेजारी पानपताचे पान पडले होते.

याच दीपाच्या परिसरांत नानासाहेबाना अटक करावयास आलेले शिंदे, मुकीरावडील शिलेदार दिसत होते. त्याच्या अंतःकरणावर काळ्या कापडाचें वेष्टन होतें.

याच दिव्य तेजाच्या सामर्थ्यानें नानासाहेबाना त्या अंधारातून भूतकाळाच्या धुंदीने दिसेनाशा झालेल्या अनेक गोष्टी, चांदीची झिलई दिल्यासारख्या दिसूं लागल्या.

रायगडावरला त्यानी दिलेला नगारखाना आता त्याच्या मंद श्वसनाक्रियेला हलके हलके हलके साथ करू लागला होता.

सनईने आता 'भूपा'च्या संगतींत स्वराच्या रेशमी कादण्या· वरल्या हिंदोळ्यावर बसून तिला न पेलण्याजोग्या उंच उंच जागीं स्पर्श करण्यास सुरवात होती.

दत्तक घेतलेल्या आपल्या मुलाला, दामोदर बळवंताला हातावर घेऊन नानासाहेब नदीच्या वाळवंटाकडे निघाले होते...त्याच्या एका मुठीत माती होती आणि एका हाताच्या उघड्या पंजावरल्या अंतः-करण रेषेवर निराशा नवीन तऱ्हेचे नमुदेदार नृत्य करीत होती.

त्या निराशेचें रूप सुंदर होतें. परंतु डोळे नको होते तेवढे काळे होते. आपल्या दुग्धगौर कायेवर तिनें काळया झिरझिरीत मलमलीची वस्त्रें परिधान केली होती. आपल्या काळ्याकुरळ्या केसास तिने कस्तुरीचे अत्तर माखले होते...

तिने खूप अलंकार घातलें होते. परंतु ते सारें 'शनी'च्या खड्याचे होते. 'शनि' हे रत्न तिचे आवडते होते.

कानांतल्या कुंडलात, नाकातल्या बिंदलीत चमकीत कपाळावरल्या, हातातल्या बिल्वरात, कंठातल्या कंठ्यात, दंडावरल्या बाजुबंदांत, जिकडे तिकडे शनीचे खडे बसविले होते.

कांहीवेळाने आपल्या नृत्यात ती महालक्ष्मीचे अंगविक्षेप करू लागली. ती आता मळवटभरून हातातली घागर एका विशिष्ट लयींत फुंकू लागली.

आणि तिच्या हातात तिनें जो घट धरला होता त्याचा आकार महाराष्ट्रासारखा होता.

त्या घटांतून आपल्या भारलेल्या फुंकरी भरून ठेवण्याच्या नादात ती सुंदर आणि नाजुक स्त्री तोल जाऊन पडली.

तिच्या मस्तकाच्या धक्यानें तो आतापर्यंत अखंडपणें तेवत असलेला नंदादीप विझून गेला.... ...

नानाचें निर्वाण झालें.

राज्यातला दाब गेला, नेट गेला, गुरुवारच्या अर्धीचप्रहर रात्रीं मार्चच्या तेरा तारखेला इसविसन अठराशे मध्यें हे झालें. मराठी राज्यतला समतोलपणा आता निमूट झाला. जो मोलाचा होता तो तोलाच्या महादजीकडे, माधवरावाकडे निघून गेला. दौलतीचा दुआ गेला. महाराष्ट्राची ' धडगत ' गेली. विशाल बुद्धिमत्तेचा माणूस नाहींसा झाला

सारे पुणे देहाला धुरात दडऊन घराकडे परतले. पुण्यात्म्याला सद्गती मिळावी म्हणून मित्रांनी लाखांनी धर्म केला. त्याच्या आत्म्याचे आगमन होताच देव सिंहासनावरून आदराने उठले ! ! !

## —१७—

# उपसंहार

पुन्हा त्या मोठ्या फ्रेममधल्या चमकणाऱ्या चित्रावळी भवताली पूर्वीची नाहींशी झालेली रंगलयें पिकल्या सिताफळीवर साळुक्यांच्या थव्याने येऊन जमावे तशीं जमली.

मग पगडी दिसूं लागली...आणि ती अशी दिसूं लागली कीं तिच्याकडे टक लावणाऱ्या जारबंदीना आपली मान अवनम्र करावी लागली.

भोवऱ्या भोंवतालच्या रशनेप्रमाणें त्या लांबोळ्या मुखच्छबीवर सुरकुत्या जमा होऊं लागल्या.

त्या प्रत्येक सुरकुत्यांत एकेक तडकलेली महत्काकांक्षा आपल्या गगनाचे चुंबन घेणाऱ्या उंचउंच निवासस्थानाची विल्हेवाट लागल्या नंतर बारीक बारीक भुऱ्या रंगाची पाले बांधून राहिल्या होत्या.

रफ्फूकाम करणाऱ्याच्या बोचक्यात अनंत रंगी धागेदोरे असावे. तसें तें आडव्या उभा सुरकुत्यांनी विनटलेलें तोंड होते.

...ते नानासाहेबांचे तोंड होते आणि पेशवाईवरली फाट-लेली आभाळें ज्यानें अनेकदा आपल्या अकलमंदीने धागेदोरे घालून ठीक ठाक केली त्या बुद्धीच्या महासागराचे तें तोंड होतें.

...सुरकुतलेलें असूनही ते मुख अत्यंत तेजस्वी दिसूं लागले. त्या मुखावरील विशाल डोळ्यांच्या दुआबांत विवंचनेत पडलेला वेलस्ली हिर्मुसलेला हेस्टिंग्ज, तोबा तोबा करणारा टिपू सारे सारे विर्घळत होते.

आणि त्या डोळयांच्या दुआव्वांत एक मोठा मोगऱ्यांचा पट मांडला होता. आणि कानांत बिगुवाळी घातलेला एक माणूस मनांत आणील ते हुकमी हातानें हाकून हवीं तीं सोंगटी सिंहासनावर नेऊन ठेवीत होता.

त्या डोळयांच्या दुआव्वांतून सहा कपाळावरल्या कुंकवाच्या टिकल्या हिरव्या चागड्याच्या होड्यात बसून चालल्या होत्या.

त्या डोळयाच्या दुआव्वांत इतिहासाला जमा करावयाला लागलेला महाराष्ट्राचा मान होता.

त्या डोळयाच्या दुआव्वांत त्या डोळयांनी हयातींत कधींही न सांडलेले माणिक मोती होते.

✦ ✦ ✦ ✦

सर्व रंगवलयें पुन्हा परत आली. आता प्रथमतः पहातांना होती तशीच ती नानासाहेबाची तसबीर गोडबोल्याच्या डोळयांना दिसू लागली.

तसबीर तीच होती.

आणि गोडबोलेहि तेंच होते.

परंतु......

✦ ✦ ✦

आतां गोडबोल्याच्या डोळ्यांत त्या चित्राकडे पहातांना अवहेलनेचे भाव तरळत नव्हते.

आता त्या चित्रित व्यक्तिच्याबद्दल कौतुक वाटण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हते.

जी व्यक्ति नसती तर अखेरीच्या अखेरचें अर्धशतक शनवार वाड्यावर जरीपटका फडफडलाच नसता !

मग नारायणाला आधार नव्हता !

कदाचीत तो तोतया भाऊसाहेबही खरेपणाने गणपती महालात बैठक माडून राज्य करून गेला असता.

आणि तसा खुळा राजा झाला असतां तर प्रजा चैतन्यहीन होत होत परकीयांच्या अंकीत झाली असती.

आणि तसें झाले नाहीं.

पुणें काबिज केले गेले तरी धुमसत राहिले. प्रतिकुल परिस्थितींत थोडे पडते घ्यावयाचे परंतु वेळ येतांच पुन्हा आपल्या इच्छित ध्येयाच्या मार्गावरून पुढें सरू व्हावयाचे हे नानासाहेबांनी महाराष्ट्राला शिकविले.

आणि त्या शिकवणीनें महाराष्ट्रांतील जाणत्यांची मने परकीय सत्तेविरुद्ध सर्वशः निःशस्त्र केली असतानाही धुमसत राहिली.

आणि नानासाहेबांच्या कारकीर्दीचा रोजमेळ इतिहासांत नसता तर...!

एलफिस्टनने शनिवार वाड्यावर बावटा लाऊन सहा महिने झाले नव्हते तोंच पुण्याच्या आसपासचे....

सिंहगड

लोहगड

पुरंदर

हे तीन किल्ले एका रात्रींत हल्ला करून काबीज करावयाच्या प्रयत्नाला मेहुणपुऱ्यांतली शंभर ब्राम्हणांची मुले लागली नसती.

त्या प्रयत्नांत अपयश येऊन ती मुलें कैदी झाली.

आणि......

आणि काहीं तोफेच्या तोंडी दिले गेले. आणि कांहींच्या जिभा देशस्वातंत्र्याच्या सिंहगर्जना करीत काळ्या टोपी खालीं घरंगळल्या.

त्या तीन किल्ले सर करूं पहाणाऱ्या महाराष्ट्राच्या पहिल्या अनामिक क्रांतीकारकांना नानासाहेबांची आठवण नव्हती तर...!

तर काय होते !

शेवटच्या बाजीरावाच्या स्मृतींत कांहीं तें आपल्या देहाचीं दानें देशासाठीं द्यावयाला निघाले नव्हते.

ज्या चिवटपणाच्या विचारांचे सूत्र धरल्याविना त्याच्या हातून तें घडणारे नव्हते तें सूत्र नानासाहेबांच्याच जीवन ग्रंथात गुंडाळलेलें होतें.

आणि हे नानासाहेब होऊन गेले म्हणून अठरासें छप्पनच्या नंतरचा हसविसन भारताच्या भाग्याची एक तेजस्वी शलाका संभाळणारी संदुक झाला.

नानासाहेबांच्या तसबिरीकडे पहातांना आतां गोडबोल्यांना अभिमान वाटू लागला.

ते आपल्या मनात म्हणाले " छे, छे, मराठी आपण वेलस्ली बरोबर तुलना करून या थोर माणसाला हिणकस ठरवितांना केवढी अक्षम्य चूक करीत होतो ? " हा विचार मनातून घुटमळू लागतांच त्याचे डोळे ओले झाले. परकीयांच्या पराक्रमाला नीट गौरविणारे कवि तिथे जिवत होते. सरस्वती सेवकाना ज्या देशात आपल्या लेखणीवर जगता येते अशा देशांतल्या देशभक्ताच्या मृत्युंची नादे धडधाकटपणानें होते.

'हौसे'ला मोल नाहीं म्हणून लिहिणाऱ्या मराठी शाहीरांना 'भलेबुद्धिचे' या पोवाड्यापलिकडे लिहावयास फुरसत नव्हती.

नारायणरावासारख्या मोठ्या मोहऱ्याच्या खुनावर 'दख्खनचा दिवा मालवला' या पलिकडे कांहीं दुसरे पोवाडे शाहीरांची मोल न मिळणारी हौशी लेखणी लिहू शकली नाही.

नानासाहेबाच्या स्मृतीला टोपी काढून आणि तलवार खाली वाकवून मुखातून धन्योद्गार काढणाऱ्या वेलस्लीच्या चरित्रासाठीं जेवढी पानें इग्रजी भाषेत खर्च झाली तेवढी पानें मराठ्यांच्या शिवाजीपासूनच्या मोठ्या प्रपंचाला सुद्धा खर्च झाली नाहींत.

आपल्या देशाचे हे दुर्भाग्य आहे.

कल्पनेचें ताजमहाल उभारू शकणाऱ्या प्रतिभासंपन्न कविंना इथे आपल्या कलमावर पोट भरता येत नाहीं म्हणून बंगले बांधाबांधाचे कंत्राट घेणाऱ्याकडे जमाखर्च लिहावे लागतात.

इथे काल असें चालले...

आणि म्हणूनच नानासाहेबांचे चित्र पाहून गोडबोल्यांना प्रथम काही विशेष वाटले नाहीं.

गुरुजी दुरुन सारे पहात होते.

तिरस्काराच्या भावना दूर टाकून गोडबोले नानासाहेबांबद्दल कौतुकाने भारले गेले आहेत हे त्यांनीं ओळखले.

गोडबोल्याच्यापेक्षां ते शहाणे होते. गोडबोल्याना जे ज्ञान आतां झाले होते तें त्याना त्यापूर्वीच होतें.

गुरुजी असे गोडबोल्यांकडे पहात असतांनाच त्यांना दिसले.

नानासाहेबांच्या त्या मोठ्या तसबिरीसमोर उभे असलेले गोडबोले आतां आपल्या हाताची अंजुली बांधू लागले.

आता गोडबोल्यांच्या डोळ्यातले नानासाहेबांच्या बद्दलचे कौतुक पृथ्वीवरल्या पहिल्या प्रलयांत स्निग्ध झाल्यामुळें ध्रुवबिंदूपासून ढळलेल्या, विरघळलेल्या बर्फा सारखें गालावरून वाहू लागले.

त्या कौतुकाश्रुंचा हार नानासाहेबांच्या कंठात घालीत असतांना गोडबोल्यांचा गळा गदगदून गेला.

काहीं वेळानें कुणाला कळतील न कळतील अशा बेतानें आपली आसवे रुमालानें पुसत तें इतर विद्यार्थ्यांत मिसळून त्या इमारती बाहेर पडले.

कांहीं वेळ गेला.

आणि इतिहासाच्या विद्यार्थ्यांना घेऊन भल्या सकाळी बाहेर पडलेली तीं मोटार पुन्हा कॉलेजच्या दिशेनें धाऊ लागली.

गुरुजींना निरोप घेऊन आणि वंदन करून सारे विद्यार्थी आपापल्या घराकडे वळले.

गोडबोलेही आपल्या रस्त्याला लागले.

◆ ◆ ◆ ◆

आता भोंवतालच्या परिस्थितीचा ते निराळ्या रीतीनें विचार करू लागले होते.

नानासाहेबांच्या चरित्रानें त्यांना अनेक गोष्टी शिकविल्या होत्या.

देशाला स्वातंत्र्य मिळूनही देशांत अनेक गोष्टींतून समाधान लाभत नाहीं याच्या जाणिवेने पूर्वी ते निराश होत.

...आज तसे ते निराश होत नव्हते.

तुरुंग फोडून बाहेर पडलेल्या कैद्यांचे नेत्र्यांचे हातावरले वळ कांहीं एक दोन दिवसात नाहींसे होत नाहींत.

दास्याच्या शृंखला तुटल्या.........जे बोजें कधी अंगावर राज्यकर्त्यांनी पेलूच दिले नव्हतें ते अनुभव नसलेल्यांच्या अंगावर येऊन पडलें.

जे स्वातंत्र्यासाठीं लढले आणि लढता लढता उरले त्यांनाच तलवारी टाकून कलमदान जवळ करावे लागले.

पण सारे रंग......भोंवतालचे सारे रंग निळे काळे असले तरी कपाळाला हात लाऊन बसण्याचे कांहीं कारण नाहीं.

अशा वेळी नानासाहेब असतें तर ! तर ते केवढ्या आशेनें कामाला लागले असतें......

❋ ◆ ❋

अमावास्येच्या अंधारात ज्यानी व्यक्तिगत हेवेदावे मुठीत धरून मातींत मिसळून टाकले आणि साऱ्या महाराष्ट्राला उजेड पोंचविणाऱ्या बारा नंदादीपाची प्रतिस्थापना केली त्या नानासाहेबांना आजचे १९५१ साल किती आशादायक वाटले असते.....

अशा वेळीं नानासाहेबांनी व्यक्तिविषयक, जातिविषयक धर्म-तंट्यांना विकोपाच्या वेशीपलीकडे जाऊ दिलें नसतें.

भावांनी भांडावयाचें असतें ते घर सांभाळावयासाठीं! घराची राख वाटून घ्यावयासाठीं जी भावंडे भांडणें करतात ती दोन पायांवरली माणसें नव्हेत. आणि आज आपण कुणासाठीं भांडतो आहोत! कुणाशी भांडतो आहोंत! कशाकरितां भांडत आहोत..... !

✦ ✦ ✦ ✦

नानासाहेब आज असते तर काळाच्या गतिमान रथाचे सारथ्य त्यांनीं पत्करिले असते.

जुने जग आता विरघळले आहे. जुने जग आतां दूर झालें आहे. इतिहासाची पुनरावृत्ति कालपर्यंत झाली असेल तर होवो......

परंतु आतां 'धर्म-संग्राम' होणार नाहींत. जगाच्या नकाशावरली 'हळद' आतां क्रांतीच्या 'कुंकवा'नें लाल करून टाकली आहेत.

समशेर! भाला! दख्खन! हुजरात! जरिपटका! हे शब्द ऐकून आता खचलेल्या कंबरा ताठ होत नाहींत.

नानासाहेबांच्या मृत्यूनंतर जग आतां कितीतरी प्रगत झालें आहे.

परंतु आजही कांहीं माणसें 'रामा'च्या राज्याकडे सुग्रीवाच्या बुद्धीनें पहात आहेत.

अंग! अवंती, अमरावती, आंध्र, आर्यावर्त, इंद्रप्रस्थ, कलिंगा, कामरूप, कुरू, कोशंबी, कपिलवस्तु, कान्यकुब्ज, कुशनगर, कोसल, गांधारू, गौड, गुर्जर, चर्मण्वती, चेदी, चेर, चोल, तक्षशिला, तोसाली, दक्षिण पथ, दंडकारण्य, धनवाटक, नालंद, निषध, पल्लव, पांचाल, पांड्य, प्रतिष्ठान, पुरुषपूर, पाटलीपुत्र, पायोष्णी, मगध, मरू, मत्स्य, मिथिला, वलभी वंग, विदेह, वैशाली, वत्स, विदर्भ, वितस्ता, शूरसेन, शतद्रू, श्रावस्ती, शाकल, शाक्य, सौराष्ट्र, सरस्वती, हस्तिनापूर, या साऱ्या 'अफाटा'

वर लक्ष ठेवणाऱ्या रामचंद्रापेक्षां नानासाहेबांच्या डोळ्याची गस्त कांहीं ' आफ्रिका ' वर होती. त्याना नेपोलियनच्या मायदेशाकडे पहावे लागले, त्याना इंग्लंडकडेही पहावे लागले.

आणि आजच्या काळांत तर आपल्या जीवनाच्या वीणेला अक्षांशा रेखांशांच्या तारा जोडल्याशिवाय स्वरवलयें स्फुरत नाहींत.

आज आणि उद्या जगू इच्छिणाऱ्या माणसाला नानासाहेबांनी हाच संदेश दिला असता कीं ' समन्वय ' करावयास शिक.

◆ ◆ ◆ ◆

संकटांचे ससेमिरे सतावत असतानाच 'साधुसंत आणि सत्कवि' ' आकाशवाण्या 'चा अर्थ विश्वाला उलगडून सांगून अवतार समाप्ती करितात.

' आलस्यो भोगाशी सादर असावयाचे आणि देवावर भार टाकावयाचे ' विचार अ पदूर टाकले पाहिजेत.

जातिवंत लोककविंनी ' उद्या'ला उजाळावयाचे असेल तर गोपाळ शाहीरासारखे व्हावयास हवे. तसे ते झाले तर... !

आणि ते होणार असतील तर त्यांना ' फिरकीचा तांब्या ' ही डोक्यावर घेण्याइतकी शक्ती नसताना गिरीश म्हणऊन घेणाऱ्यांच्या वाटेने जाऊन चालणार नाहीं.

टीकेचा लाव्हा त्याला प्यावा लागेल; जीवन त्याला ' भुकेकडे ' गहाण ठेवावे लागेल. आपल्या टाकाला त्याला भगत्‌सिंगाच्या हातातील पेटलेल्या पिस्तुलाला खर्चे झालेल्या पोलादापासून तयार केलेले ' निफ ' जोडावे लागेल.

आजच्या जगात त्याच्या डोळ्यादेखत त्याचा गौरव झालेला त्याला दिसणार नाहीं. स्वतःचा गाजावाजा जे करीत नाहींत ते आज अज्ञानांत रहातात आणि जे स्वतः ' अहोरूपम अहोध्वनी ' कां काय म्हणतात तें करीत रहातात; त्या 'मामुलीं'ची नांवे आज मशहूर झालेली आढळतात.

परंतु ' गोपाळ ' शाहीर आज असता तर त्यानें इथे लौकिक मिळत नाहीं म्हणून ' पारलौकिका'ला सोडले नसते

आणि आज नानासाहेब असते तर सवंग पुढारीपणाच्याहि ते पाठीमागें लागले नसते.

गोडबोल्यांना हे आता कळू लागले. नानासाहेबांच्या आयुष्याचा सर्व चित्रपट त्यांच्या डोळ्यासमोरून धावत गेल्यानंतर....

निराशा त्यांच्या डोळ्यावरून आणि चित्तावरून दहा कदम दूर पळाली. अतृप्तीच्या पथावरूनच खऱ्या कर्मवीराला चालावे लागते.

ज्याला शेवट नाहीं अशा शिखराला ओलांडावयाची ईर्षा बांधूनच त्याला पुढें आणि पुढें चालावें लागतें.

पुढे आणि पुढें......
पुढें आणि पुढें......

✦ ✦ ✦

नानासाहेब आज असते तर आजच्या गोपाळ शाहीराच्या कानाशीं ते कांहीं कुजबुजले असते आणि मग गोपाळ शाहीराने आपल्या डफावर थाप मारली असती...

जाती बाबा दोन
जगांतील जाती बाबा दोन ॥ धृ ॥

✦ ✦ ✦ ✦

एक आहे ढेरपोट्या
कीर्दी लिहितो खोट्या
लक्ष्मीचंद

पितो दहा दुधाच्या लोट्या
दुसऱ्याला तृषा तोडिते
आतडे त्याचे भूक खर्वडते
कामकरी
शेतकरी
मृत्यू करितो रोज त्याला 'फोन' ॥ ध्रृ ॥

—–०—–

